# संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें

## भाग पहिला. ( सचित्र )

किंमत १० आणे.

नी. शं. नवरे

# संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें

## भाग १ ला. ( सचित्र )



नीळकंठ शंकर नवरे,
बी. ए. ( ऑनर्स ), बी. टी.
कादंबरीकथा व रघुवंशकथा या पुस्तकांचे कर्ते.
संस्कृत शिक्षक, नॉर्थकोट हायस्कूल, सोलापूर.

द्वितीयावृत्ति
( सुधारून वाढविलेली )

आर्यसंस्कृति-मुद्रणालय, पुणें.

मूल्य १० आणे १९३३

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना

मुलांना वाचनाची गोडी लावण्यास गोष्टींच्या पुस्तकांसारखें अन्य सुलभ साधन नाहीं. बालरामायण व बालभारत यांसारखीं पुस्तकें लिहून रा. वासुदेव गोविंद आपटे यांनीं रामायण व महाभारत हीं मुलांच्या आटोक्यांत आणलीं आहेत; पण चार्लस् लॅंबकृत शेक्सपिअरच्या नाटयकथा ( Lamb's Tales from Shakespeare ) या पुस्तकाच्या धर्तीवर मुलांकरितां लिहिलेल्या संस्कृत कवींच्या नाट्यकथा अद्याप पाहण्यांत आल्या नाहींत. के० हरिभाऊ आपटे यांनीं फक्त भासकवीच्या नाटककथा प्रसिद्ध केल्या आहेत.

डॉक्टर भांडारकरांचीं पुस्तकें शिकवीत असतां मला असा अनुभव आला आहे कीं, 'तूलस्य राशावग्नेरिव मृदुनि मृगस्य शरीरे निशितस्य बाणस्य पातः', 'हंस प्रयच्छ मे कान्तां गतिरस्यास्त्वया हृता,' 'शृणुत रे पौरा अयं वसंतसेनाघातकश्चारुदत्तो वधस्तम्भं नीयते' अशा तऱ्हेचीं संस्कृत नाटकांतर्गत वाक्यें संदर्भाशिवाय विद्यार्थ्यांस नीट समजत नाहींत; म्हणून मला त्या त्या नाटकांचीं कथानकें सांगावीं लागत. गोष्ट म्हटली कीं, ती पूर्ण ऐकल्याशिवाय मुलांचें समाधान होत नाहीं, व 'सर, सबंध गोष्ट सांगा,' असें म्हणून मुलें पाठीमागें लागतात; मग रोजचा अभ्यास बुडाला, किंवा त्या दिवसाचा तास गोष्टींत गेला तरी मुलांना त्याचें कांहीं वाटत नाहीं, उलट अशा प्रकारची संधि केव्हां येते. याची तीं उत्कंठेनें वाट पाहत असतात. गोष्टीला सुरवात झाली कीं, नेहमीं दुर्लक्ष्य करणारीं, पाठ चालू असतां मध्येंच वाटेल ते प्रश्न करून शिक्षकास भंडावून सोडणारीं, शेजाऱ्च्या मुलांशीं कुजबुजणारीं, खोड्या करणारीं वगैरे चटसारीं मुलें कथासूत्रांत गोवलीं जातात; हा अनुभव मजप्रमाणें माझ्या व्यवसायबंधूंस खालच्या वर्गांतच केवळ नव्हे, पण थेट मॅट्रिकच्या वर्गापर्यंत आला असेल !

कुसुममालेसारख्या अभ्यासपुस्तकांत दिलेले संस्कृत नाटकांतील उतारे व आपटे यांच्या गाईडमधील त्रुटित वाक्यें व श्लोक वाचणाऱ्या विद्यार्थ्यांनाहि नाटकांचीं संविधानकें माहीत नसल्याकारणानें, अर्थबोध होण्यास पदोपदीं पंचाईत पडते, ती अंशतः दूर व्हावी या उद्देशानें कालिदास–भवभूतिप्रभृति संस्कृत कविवर्यांच्या

न टकांचीं कथानकें सुबोध गोष्टींच्या रूपानें प्रस्तुत पुस्तकांत दिलीं आहेत. होतां होईल तों मुळांतील स्वारस्य व सौंदर्य मराठींत आणण्याचा यथामति प्रयत्न केला आहे. रसिकवर्य परशुरामतात्या गोडबोलेप्रभृति विद्वद्वर्गानें या अप्रतिम नाट्यसंपत्तीचा मराठी वाचकांस आस्वाद घेण्याची सोय करून मोठीच कामगिरी केली आहे, पण त्यांच्या कृतींचा व्हावा तसा आदर होत नाहीं. याकरितां निदान गोष्टींच्या रूपानें तरी हें संस्कृत वाङ्मय बालवाचकांच्यापुढें ठेवणें इष्ट वाटल्यावरून हा उपक्रम केला आहे. हायस्कुलांतील विद्यार्थ्यांस, तसेंच माझ्या संस्कृत न जाणणाऱ्या लहानमोठ्या मित्रांनाहि प्रस्तुत पुस्तक उपयुक्त व आल्हादकारक वाटेल व कित्येकांस मूळ कृतींकडे धाव घ्यावी अशी उत्सुकता होईल असा मला भरंवसा आहे. कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं नाटकें वाचण्यास प्रारंभ करण्यापूर्वी या पुस्तकावरून संविधानकें समजून घेतल्यास नाट्यवाङ्मयांत त्यांचा प्रवेश सुलभतेनें होईल अशी खात्री आहे. मुद्राराक्षसाच्या कथानकाची गुंतागुंत उकलण्यास कॉलेजच्या विद्यार्थ्यांसहि बराच कालावधि लागतो असा अनुभव आहे. संदर्भपुस्तक म्हणूनहि कांहीं रसिकांस हें संग्राह्य वाटेल. सामान्य संस्कृतमराठी वाचकांस इच्छा असूनहि संस्कृत कवींची प्रत्यक्ष ओळख करून घेण्यास फुरसत नसते, त्यांना सदहू मध्यस्थाच्या मार्फत या 'शब्दसृष्टीच्या ईश्वरांची' तोंडओळख करून घेतां येईल अशी आशा आहे.

सदर पुस्तकाचें हस्तलिखित वाचून गुरुवर्य डॉ. वा. गो परांजपे, गुरु. म. पां ओक, प्रो. श्री. नी. चापेकर व श्री. वा. गो. आपटे यांनीं पुस्तकाची भाषासरणी, कथासूत्रें वगैरे हरएक बाबतींत योग्य त्या सूचना केल्या त्यांचा फार उपयोग झाला. त्यांनीं प्रोत्साहन दिल्यामुळें हें पुस्तक इतक्या लवकर प्रसिद्ध होत आहे. तसेंच माझे मित्र रा. श्री. रा. टिकेकर यांनीं हस्तलिखित तपासण्याच्या कामीं मला स्नेहभावानें साहाय्य केल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. सोलापुरच्या ह. दे. हायस्कूलचे हेडमास्तर प्रो. गो. प. पटवर्धन यांची मदत मुद्रितें दुरुस्त करतांना मला फार झाली याबद्दल त्यांचा आदरपूर्वक उल्लेख करणें हें माझें कर्तव्य होय.

सोलापूर,
पौष शु. ११ शके १८४९
३ जानेवारी १९२८

नीलकंठ शंकर नवरे.

शब्दानें केलेलें पाल्हाळिक वर्णन ज्याप्रमाणें चित्ररूपानें अत्यंत संक्षिप्त पण परिणामकारक रूपांत प्रतिबिंबित होतें, त्याचप्रमाणें संसारांतील अनंत अनुभवाचा अर्क एकाद्या सुभाषितांत काढला जातो. सुभाषितांचें प्रामाण्य कोणताहि रसिक अमान्य करीत नाहीं. पुष्कळशा स्थूल द्रव्यांचा संक्षेप करीत करीत ज्याप्रमाणें शाईचा अर्क अतिशय थोडया अवकाशांत साठविलेला असतो आणि त्या अर्काची पुनः गरजेप्रमाणें व्यवहारार्थ शाई बनविणें झाल्यास त्यांत बरेंचसें पाणी घालावें लागतें त्याप्रमाणें सुभाषितांचेंहि आहे. सुभाषितकार सुभाषितरूपानें आपणांस अनुभवार्क देत असतो. त्या अर्काची व्यावहारिक व्याप्ति करणें झाल्यास आपणासहि स्पष्टार्थबोधक इतर शब्द त्या अर्कांत मिसळून त्याचा व्यवहारांत उपयोग करावा लागतो. याच न्यायानें पुस्तकाच्या शेवटीं संगृहीत केलेल्या पसतीस सुभाषितांचा विस्तार विद्यार्थ्यांनीं करून पाहावा.

ही द्वितीयावृत्ति शक्य तितकी निर्दोष व सर्वांगसुंदर करण्याच्या कामीं, संस्कृत-प्रवेशकर्ते श्री. रा. दा. देसाई, बी. ए, श्री. के. ल. ओगले, बी. ए., मित्रवर्य बाबुराव महाबळेश्वरकर व श्री. ह. वा. पावसकर, एम्. ए. यांचें बरेंच साहाय्य झालें आहे, त्याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

नाट्यकथानकाच्या दुसऱ्या भागांत मालविकाग्निमित्र, मालतीमाधव, नागानंद इत्यादि नाटकांच्या कथा लिहिण्याचा विचार आहे.

सोलापूर
१५ डिसेंबर १९३२

नीळकंठ शंकर नवरे

# द्वितीयावृत्तीचा विशेष

या आवृत्तींत शाकुन्तलाचें कथानक चार पृष्ठें वाढविलें असून इतर कथांमध्येंहि कोठें कोठें अधिक मजकूर घातला आहे. टीपा लिहितांना आरंभीं कवींची नाटक-माहिती दिली आहे. प्रो. द. वा. पोतदार, काव्यालोचनकर्ते श्री. द. के. केळकर व इतर अनेक शिक्षक यांच्या सूचनेवरून कथेच्या ओघांत येणारीं संस्कृत सुभाषितें त्या त्या स्थळीं तळटीपांतून दिलीं असून पुस्तकाच्या अखेरीस तीं सर्व एकत्रित केलीं आहेत. ह्यायोगें पुस्तकाच्या उपयुक्ततेंत भर पडेल असा मला भरंवसा वाटतो.

उत्तमोत्तम संस्कृत नाटकांचा परिचायक ग्रंथ म्हणूनच केवळ नव्हे, तर मराठी वाङ्मय म्हणूनहि या पुस्तकाचा उपयोग करतां येईल असें कांहीं माध्यमिक शाळा-चालकांचें मत पडून त्यांनीं हें पुस्तक पुरवणीवाचनासाठीं म्हणून मराठी अभ्यास-क्रमांत समाविष्ट केलें आहे. मराठी पांचव्या, सहाव्या व सातव्या क्रमिक पुस्तकां-तून दिलेले चारुदत्ताचे उद्गार ( मृच्छकटिक ), लव आणि चंद्रकेतु ( उत्तर राम-चरित ) आणि कर्ण व अश्वत्थामा यांचा कलह ( वेणीसंहार ) हे व असेच इतर उतारे शिकवितांना प्रस्तुत पुस्तकाचा आपणास फार उपयोग होतो असें कांहीं प्राथमिक शिक्षकांनीहि लेखकास कळविलें असून कांहीं प्राथमिक शाळांमधून उच्च वर्गांकरितां हें पुस्तक पुरवणीवाचनासाठीं लाविलें आहे.

चार्ल्स् लँब यानें शेक्स्पिअरच्या नाटकांच्या गोष्टी लिहिल्या तशा प्रकारच्या आपल्या संस्कृत नाटककारांच्या कथा मराठींत कां होऊं नयेत असें मला विद्यार्थि-दशेपासून सारखें वाटत होतें. ती कल्पना फलद्रूप होऊन माझी कृति आबालवृद्ध वाचकांस प्रिय झाली ह्याचें माझ्या मनास समाधान वाटत आहे. तथापि याचें श्रेय प्रस्तुत लेखकाकडे नसून ज्यांच्या चिरपरिचित कृति त्यानें मराठींत आणल्या त्या कविश्रेष्ठांकडे आहे. कारण मूळच्या संस्कृत नाटकांची माधुरी अवीट आहे.

ह्या आवृत्तींत चित्रकार श्री. नी. म. केळकर, बी. ए., यांच्याकडून काढून घेतलेलीं कांहीं रेखाचित्रें घातलीं आहेत. विद्यार्थिवर्गानें या चित्रांचें शब्द-चित्रांत पुनः रूपान्तर करून पाहण्यासारखें आहे. म्हणजे पुस्तकांत काढलेलें शब्दचित्र, त्याचें चित्रकारानें काढलेलें दृश्यचित्र व त्याचें पुनः विद्यार्थ्यानें काढ-लेलें शब्दचित्र हीं परस्पर पडताळून पाहतां येतील.

# उपोद्धात

( ले. **वा. गो. परांजपे**, एम्. ए., एलूएल्. बी., डी. लिट्. (पॅरिस)
प्रोफेसर, फर्ग्युसन कॉलेज, पुणें. )

नाटयकवींच्या खऱ्या काव्यगुणाची कल्पना येण्याकरितां त्याचें मूळ नाटकच वाचलें पाहिजे असें जरी आहे तथापि नाट्यकथेच्या सारांशावरूनहि त्याच्या सन्निधानकचातुर्याची व पात्ररेखनाची कल्पना करितां येते व अनेक कवींनीं आपल्या नाटकांत रंगविलेलें जें समाजाचें चित्र दिसून येतें त्यामुळें मनाला आनंद तर होईलच, पण धीरोदात्त स्त्रीपुरुषांच्या प्रत्यक्ष समागमापासून जो मनावर इष्ट संस्कार व्हावयास पाहिजे तो होऊन §पूर्वसंस्कृतींचेंहि ज्ञान होण्यास मदत होईल.

संस्कृत वाङ्मयाची सध्यांची जी स्थिति आहे तिच्यांत कवींचा कालक्रम ठरविणें फार कठीण आहे. प्रस्तुत नाट्यकथागुच्छांत कालिदास, भवभूति; भास, शूद्रक; विशाखदत्त व भट्टनारायण अशा तीन कवियुग्मांचा आपणांस सहवास होणार आहे. यांत कालिदासाच्या कालासंबंधानें दोन मतें आहेत व असा मतभेद भास, शूद्रक व विशाखदत्त यांच्या कालाविषयींहि आहे. येथें सारांश दिलेलें स्वप्नवासवदत्त तर भासाचें तरी आहे कीं नाहीं असाच प्रश्न कोणीं उपस्थित केला आहे. ह्या स्थळीं ह्या वादांचें दिग्दर्शनहि करणें अप्रस्तुत आहे. सिद्धान्तरूपानें वैयक्तिक मत व मांडतां येईल व तें असें : शूद्रक व भास हे कालिदासपूर्व, पण त्यांच्या नाटकांचीं उपलब्ध स्वरूपें कालिदासोत्तर काळचीं असावींत. कालिदास हा चंद्रगुप्त विक्रमादित्य ( क्रिस्तोत्तर सुमारें ३८० ) याच्या वेळीं उदयास आला.

---

§ मृच्छकटिकाचा प्रयोग न्यूयार्कमध्ये सन १९२४ मध्यें झाला, त्या वेळीं प्रसिद्ध काव्यकलारसज्ञ J. W. Krutch यानें पुढीलप्रमाणे लिहिलेला अभिप्राय J. J. Meyer याने आपल्या अर्थशास्त्रावरील ग्रंथांत उद्धृत केला आहे.

‘ स्थैर्य पावलेल्या संस्कृतींतच असें नाटक होऊं शकेल. सर्व तऱ्हेच्या प्रश्नांचा ऊहापोह होऊन निर्णय झाल्यानंतर ही शांतता व हा साधेपणा कोणत्याहि संस्कृतीला लाभतो ... ग्रीक व रोमन वाङ्मयानंतर अलीकडच्या काळांत यूरोपमध्ये कोणत्याहि ग्रथांत ह्यापेक्षां अधिक श्रेष्ठ संस्कृति दिसत नाहीं.’

भट्टनारायण हा सातव्या शतकांतला व भवभूति हा आठव्या शतकांतला. विशाख-दत्त हा ह्या सुमारासच केव्हां तरी झाला असावा.

कालगणनेला योग्य साधन नसल्यामुळें प्रस्तुत ग्रंथांत एका टोकाला कविकुलगुरूंची अग्रमणिस्थानीं योजना करून दुसऱ्या टोकाला त्याच्याच जोडीच्या भवभूतीनें सराची समाप्ति केली आहे व ह्या दोहोंच्यामध्यें दुसऱ्या महाकवींना त्यांच्या अंदाजी कालानुक्रमानें गुंफिले आहेत हें योग्यच झालें.

कालिदासानें आपल्या नाटकांचीं कथानकें महाभारत व पुराणें यांवरून घेतलीं असलीं तरी जुन्या कथाभागापेक्षां त्यानें नवीन कल्पिलेला कथाभागच नाट्य-दृष्ट्या अधिक महत्त्वाचा आहे. त्याच्या दोन्ही नाटकांत प्रणयाचा विकास, त्याला आलेलीं विघ्नें व त्यांचा निरास होऊन त्याचें परिणतावस्थेला पोचलेलें स्वरूप, असें प्रायः प्रेममय संसारचित्र रेखाटलेलें आहे. विक्रमोर्वशीयापेक्षा शाकुंतलांत हें प्रेमाचें स्वरूप अधिक व्यापक व शुद्ध स्वरूपाचें दिसतें, कारण त्यांत पतिपत्नी-प्रेमाच्या जोडीनें अपत्यस्नेहाला स्थान मिळालें आहे. प्रेमाचा झरा जगांत अक्षय चालणारा आहे, व कालिदासाच्या कृतींत लोकोत्तर प्रेमाचा मासला मिळणेंहि शक्य नाहीं. तथापि जुन्या राजकुलांतील संस्कृतीचें अत्युत्तम स्वरूप, त्यांतील शिष्टसंमत आचार व अभिजात संभाषण आणि काव्य, संगीत, नाट्य, चित्रकला, अर्थशास्त्र, भूगोल, तत्त्वज्ञान व धर्मग्रंथ यांविषयीं अभिज्ञता ह्यांची साक्ष कालि-दासाच्या कृतींवरून पटते.

कालिदासाच्या नाटकांवरून जें समाजाचें चित्र आपल्यापुढें उभें राहतें त्याचीच पूर्ति शूद्रक व भास यांच्या नाटकांनीं होतें. मृच्छकटिकांत चोरी, खून व कामासक्ति यांचा देखावा जरी मूर्तिमंत पुढें उभा राहतो तरी त्या सर्वांच्या बुडाशीं खऱ्या सात्त्विक आचाराचेंच चित्र आहे* व जसा कृष्णवर्णानें गौरवर्ण अधिक उज्ज्वल दिसतो तसा येथें दुष्टव्यवहारानें सदाचार अधिक खुलविला आहे. मृच्छ-कटिकाचें संविधानक कविकल्पितच आहे व जगाच्या वाङ्मयांत अत्युत्कृष्ट तीन संविधानकांत त्याची गणना होईल. स्वप्नवासवदत्ताचें कथानक जरी गुणाढ्याच्या बृहत्कथेंतून घेतलेलें आहे तरी कवीनें प्रसंगाची जी निवड केली आहे व ज्या तऱ्हेनें त्याची मांडणी केली आहे त्यांवरून त्याची प्रतिमा स्पष्ट होते. प्रेमाचें आणि आर्य व शुद्ध भावनांचें अत्यंत उदात्त स्वरूप संस्कृत वाङ्मयांत, व अर्थात्

---

* Winternitz-Gesch. III. 209.

जगाच्या वाङ्मयांत बघायचें झालें तर स्वप्नवासवदत्त व उत्तररामचरित हीं वाचावींत.

वेणीसंहार व मुद्राराक्षस यांत सुव्यवस्थित समाजापेक्षा विसकटलेला समाज व त्याच्या अनुषंगानें येणाऱ्या कपटपटु लोकांच्या घालमेली व शस्त्रास्त्रांचें खणखणाट यांचा अनुभव येतो. वेणीसंहारांत महाभारतांतील सभापर्वापासून शल्यपर्वापर्यंतचा वृत्तांत चित्रपटाच्या धर्तीनें मांडला आहे व वाचकांना महाभारतांतील ओजस्वी कथानकाचें व स्फूर्तिदायक प्रसंगांचें थोडक्यांत दर्शन घडविलें आहे. मुद्राराक्षसांतील संविधानक गुप्तपोलिसी कादंबरीप्रमाणें भानगडीचें पण फार चातुर्याचें आहे व चाणक्याची निःस्वार्थ व निरहंकार शिष्यभक्ति व राक्षसाचा मित्रस्नेह यांनीं ह्या दोन कारस्थानी पुरुषांच्या डावपेचाला हृदयस्पर्शी स्वरूप दिलें आहे.

वाल्मीकीच्या उच्चतम ध्येयकल्पनेस दृश्यकाव्यरूप द्यावयाला भवभूतीसारखा एखादाच शुद्धात्मा कवि समर्थ होईल. त्यानें वर्णिलेलें राज्याभिषेकानंतरचें श्रीरामचरित प्रथम दांपत्यप्रेमाचें, मग जनापवादाच्या भीतीनें आवश्यक झालेल्या विरहदुःखाचें, नंतर ह्या विरहार्ताच्या निस्सीम प्रेमाचें व पुढें देवतांच्या प्रसादानें प्राप्त झालेल्या पुनर्मिलनाचें व अपत्यसुखाचें दृश्य उभें करितें व तें प्रत्यक्ष होत असतांना महानुभावांच्या सांनिध्यामुळें कोणाच्या मनांत सात्त्विक भावाचा प्रादुर्भाव होणार नाहीं, व जगद्वंद्य पुरुषांशीं काव्यमय तादात्म्य पावल्यावर कोणाला दैवी संपत्ति प्राप्त होणार नाहीं?

व्यास, वाल्मीकि व गुणाढ्य यांनीं जो सुंदर काव्यवृक्ष लाविला त्याचींच मधुर फळें कालिदास, शूद्रक, भास व भवभूति यांच्या नाटकांच्या रूपानें आपणांस चाखावयास मिळत आहेत. धन्य भरतभूमि की जिच्यांत हे कवि निपजले व जिच्या काव्यवैभवानें अवनतीच्या काळीं सुद्धां तिचें जगांतील गौरव अणुमात्र कमी झालें नाहीं!

---

## अनुक्रमणिका

# कालिदासकृत अभिज्ञानशाकुंतल*

## पात्रें

**दुष्यन्त**-पुरुवंशांतील हस्तिनापूरचा एक राजा.
**शकुन्तला**-कण्वाची मानलेली कन्या, दुष्यन्ताची पत्नी
**प्रियंवदा** } शकुन्तलेच्या
**अनसूया** } मैत्रिणी
**गौतमी**-एक वृद्ध स्त्री
**कण्व** }
**दुर्वास** } ऋषि
**मारीच** }
**मातलि**-इंद्राचा सारथि

### भाग १ ला

मुलांनो, आपल्या देशाला भरतखंड असें नांव आहे. हें नांव कसें पडलें तें तुम्हांस ठाऊक आहे काय? नसेल तर मी सांगतों, ऐका.

फार प्राचीन काळीं दुष्यन्त नांवाचा एक मोठा राजा होऊन गेला. एके दिवशीं तो रथांत बसून शिकार करण्याकरितां वनांत गेला असतां एक हरीण त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां सारथ्यास वेगानें रथ हाकण्यास आज्ञा करून तो त्याचा पाठलाग करूं लागला. हरीण भयभीत होऊन टण्टण् उड्या टाकीत सैरावैरा धावूं लागला. त्याला पाहून राजाला वाटलें कीं, हा जमिनीला पाय न लावतां जणुं काय अंतराळींच पळत आहे! त्याच्याशीं स्पर्धा करण्यासाठींच कीं काय, दुष्यन्ताच्या रथाचे घोडेहि भरधाव धावत सुटले! पण बिचारा हरीण तो त्यांच्यापुढें कितीसा टिकाव धरणार! कांहीं वेळानें तो राजाच्या आटोक्यांत आला व राजा नेम धरून

*अभिज्ञान म्हणजे ओळख पटण्याची खूण. खूण दृष्टीस पडल्यावर राजास शकुन्तलेचें स्मरण झालें, या प्रसंगाचें वर्णन या नाटकांत असल्यामुळें या नाटकास अभिज्ञानशाकुन्तल असें नांव कालिदासानें दिलें आहे.

त्याच्यावर बाण सोडणार इतक्यांत 'हां, हां, मारूं नको, या हरिणास मारूं नको, हा आश्रमांतील हरीण आहे' अशी आरोळी राजाच्या कानीं आली आणि तत्काळ त्यानें सारथ्यास रथ थांबविण्याला सांगितलें. आणि पाहतो तों दोन तपस्वी पुढें उभे. ते हात वरती करून पुनः म्हणाले, "अरे राजा, ह्या हरणाची शिकार करणें योग्य नव्हे. तुझें हें शस्त्र निरपराध्यांची हत्या करण्याकरितां नाहीं, तर केवळ पीडितांचे दुःखहरण करण्याकरितांच आहे."

'बरें तर, हा पाहा बाण परत घेतला' असें म्हणून दुष्यन्तानें धनुष्य खालीं ठेविलें.

राजाचें थोर व सदय हृदय पाहून तपस्वी संतुष्ट झाले. 'तुझ्या सारखाच सद्गुणी चक्रवर्ती पुत्र तुला होईल' असा त्याला त्यांनीं आशीर्वाद दिला आणि ते म्हणाले, 'राजा, समिधा आणण्याकरितां आम्ही बाहेर पडलों आहों. हा पाहा, मालिनी नदीच्या तीरावर कुलपति कण्वमुनींचा आश्रम दिसतो आहे. तुला सवड असेल तर तेथें जाऊन तूं पाहुणचार घे. कुलपति सांप्रत आश्रमांत नाहींत. ते सोमतीर्थास गेले आहेत. तथापि कोणी अतिथि आला तर त्याचा सत्कार करण्याचें काम त्यांनीं आपली दुहिता शकुन्तला हिच्यावर सोंपविलें आहे.'

हे ऐकून राजा म्हणाला, 'ठीक आहे. मी आश्रमांत जातों आणि शकुन्तलेचीच भेट घेतों. मी दर्शनाकरितां येऊन गेलों ही गोष्ट ती महर्षींना कळवील.

इतकें बोलणें झाल्यावर तपस्वी आपल्या कामाला गेले आणि दुष्यन्त रथांतून खालीं उतरला व तपोवनांत राजाच्या थाटामाटानें जाणें बरें नाहीं असा विचार करून त्यानें आपल्या अंगावरील राजचिन्हें व धनुष्यबाण सूताच्या स्वाधीन केलीं व तो साध्या व नम्र वेषानेंच आश्रमाकडे जावयास निघाला.

आश्रमद्वाराजवळ पोहोंचतांच लहान लहान कळशा हातांत घेऊन वृक्षवेलींना पाणी घालीत असलेल्या दोनतीन तपस्विकन्या त्याच्या नजरेस पडल्या. पण त्यांना मात्र राजा दिसत नव्हता. त्या हसत खेळत मधून मधून एकमेकींची थट्टा करीत होत्या. इतक्यांत एक भुंगा गुं गुं करीत शकुन्तलेच्या मुखकमलाभोंवतीं घिरट्या घालून तिला त्रास देऊं लागला; म्हणून तिनें आपल्या दोघी मैत्रिणींस त्या भ्रमरापासून आपली सुटका करण्यास सांगितलें. तेव्हां त्या हसत हसत म्हणाल्या, 'आम्ही कसली ग तुझी सुटका करणार ? तपोवनाचें[1] रक्षण करण्याचें काम राजाचें असतें; तर दुष्यन्त राजालाच बोलाव.'

हा सर्व प्रकार दुष्यन्त राजा झाडाच्या आडून पाहात होता. आपणांस प्रकट होण्यास ही उत्तम संधी आहे असें पाहून 'हां ! भिऊं नका ! भिऊ नका ! दुष्यन्त राजा पृथ्वीवर राज्य करीत असतां तपस्विकन्यांना कोण हा त्रास देत आहे ? ' असें म्हणत तो चटकन पुढें झाला.

राजाला पाहून त्या सगळ्या जणी क्षणभर गोंधळल्यासारख्या झाल्या. त्यांपैकीं अनसूया नांवाची शकुन्तलेची एक सखी तिच्याकडे बोट करून राजाला म्हणाली, 'आर्या, आमच्यावर कांहीं मोठेसें संकट आलें आहे असें नाहीं; ह्या आमच्या प्रियसखी शकुन्तलेच्या मागें लागून भुंग्यानें तिला अगदीं बेजार केलें आहे. त्यामुळें ती घाबरल्यासारखी झाली आहे इतकेंच. दुसरें कांहीं नाहीं. '

हा प्रसंग साधून दुष्यन्तानें शकुन्तलेकडे वळून तिला विचारलें, 'काय ! तपश्चर्या ठीक चालली आहे ना ?'

शकुन्तला भीतीमुळे उत्तर न देतां साहजिकपणें तशीच उभी राहिली. तथापि तिची व राजाची दृष्टादृष्ट होतांच त्यांच्या मनांत परस्परांविषयीं प्रेम उत्पन्न झालें.

---

१ राजरक्षितव्यानि तपोवनानि नाम ।

इतकें गोड भाषण करणारा हा तेजस्वी पुरुष आहे तरी कोण याविषयीं प्रियंवदा व अनसूया एकमेकींशीं कुजबुजूं लागल्या.

शेवटीं मनाचा धडा करून अनसूयेनें राजास विचारलें, 'आपल्या जन्मानें कोणता राजवंश आपण भूषित केला आहे? आपल्या विरहानें कोणत्या देशाचे लोक दुःखी झालेत आहेत बरें? आणि तपोवनांत येण्याचे श्रम आपण कां घेतले?'

'पौरवराजानें आमच्यावर धर्मकृत्यांची व्यवस्था पाहण्याचें काम सोंपविले असल्यामुळें आम्ही आश्रमाची पाहणी करण्यास येथें आलों आहों' असें आपला थांग लागूं न देणारें अर्थात् उडवाउडवीचें उत्तर देऊन राजानें तिला म्हटलें, 'आम्हांला आपल्या मैत्रिणीसंबंधीं कांहीं विचारावयाचें आहे.'

**अनसूया**–खुशाल विचारा. संकोच धरण्याचें कारण नाहीं. आम्ही आपला हा आमच्यावर अनुग्रहच समजतों.

**राजा**–भगवान् कण्वमुनि हे आजन्म कडकडीत ब्रह्मचारी आहेत असें ऐकतों, आणि तुमची ही सखी शकुन्तला त्यांची कन्या म्हणतां, हें कसें काय?

**अनसूया**– ऐकावें महाराज. शकुन्तला ही कांहीं कण्वऋषींची स्वतःची मुलगी नव्हे. ही विश्वामित्रऋषींची कन्या. हिची माता मेनका नांवाची अप्सरा. आईबापांनीं हिला रानांत टाकून दिल्यावर कण्व-बाबांनीं हिला लहानाची मोठी केली; म्हणून ही त्यांची धर्मकन्या होय.

**राजा**–( आश्चर्यानें ) अस्सें! एकूण ही तुमची मैत्रीण अप्स-रेची कन्या म्हणावयाची.

**प्रियंवदा**:–(एकदा शकुन्तलेकडे व एकदां राजाकडे स्मितपूर्वक पाहात ) आतां योग्य वर पाहून तिचा विवाह उरकून टाकण्याचा कण्वबाबांचा विचार आहे.

प्रियंवदेच्या या शेवटच्या भाषणानें शकुन्तला रागावल्यासारखें

करून भुवया चढवून तिच्याकडे पाहूं लागली. इतक्यांत एक तापस घाबऱ्या घाबऱ्या ओरडत आला, "सावध राहा, सावध राहा! रानांतला पिसाळलेला एक हत्ती मृगयाविहार करण्याकरितां आलेल्या दुष्यन्ताच्या सैन्यास पाहून बुजला व इतस्ततः धावत सुटला आहे. तरी आश्रमांतील प्राण्यांचें रक्षण करण्यास सिद्ध व्हा." तेव्हां राजा मुलींना म्हणाला, "तुम्ही ही आरडाओरड ऐकून घाबरून गेलां आहां व आश्रमांत परत जाण्यास उत्सुक दिसतां; म्हणून तुम्ही जा आणि मीहि आश्रमास कोणत्याहि तऱ्हेचा उपसर्ग पोहोंचणार नाहीं अशी व्यवस्था करतों."

सख्या म्हणाल्या, 'महाराज, आमच्याकडून आपला सत्कार कांहींच झाला नाहीं, तेव्हां आपण पुनः येऊन दर्शन द्यावें.'

दुष्यन्तानें उत्तर केलें,'आपल्या सर्वांच्या दर्शनानें व गोड भाषणानें माझें आतिथ्य होऊन चुकलें आहे, तेव्हां जा आपण.

नंतर सख्या उटजाकडे जाण्यास निघाल्या. शकुन्तला लज्जित होऊन इतका वेळ स्तब्ध उभी होती. ती आतां मागें तोंड वळवून दुष्यन्ताकडे चोरून पाहत रेंगाळत रेंगाळत त्यांच्याबरोबर निघून गेली.

इकडे दुष्यन्तहि आश्रमाच्या त्या वृक्षवाटिकेंतून बाहेर पडला व प्रथम त्यानें आपला शोध करीत आलेली सेना आश्रमास त्रास होतो म्हणून राजधानीकडे रवाना केली. परंतु त्याला मात्र तिकडे जाण्याची उत्सुकता राहिली नाहीं. तपोवनांत त्यानें सर्वत्र शांतता प्रस्थापित केली खरी, पण त्याच्या मनांत मात्र अशांतता उत्पन्न झाली! याचें कारण, शकुन्तलेची गांठ कशी पडेल हा एकच विचार त्याच्या मनांत घोळूं लागला. म्हणून त्यानें तेथेंच जवळपास कांहीं दिवस तळ देण्याचा बेत केला. इकडे उटजांत शकुन्तलेची तीच स्थिति झाली! तीहि राजाकरितां झुरणीस लागली होती.

आश्रमाशेजारीं तळ दिल्यानंतर एके दिवशीं दुपारीं दुष्यन्तास

वाटलें कीं, आपल्या शिणलेल्या जिवाची करमणूक करण्यास मालिनीतीरावर जावें; तेथें कदाचित् शकुन्तलेची भेट होईल. जातां जातां तो एका लतामंडपापाशीं आला व बाहेर उभें राहून पाहतो तों आंत शकुन्तला व तिच्या मैत्रिणी ! त्यांस पाहून खरोखर आपल्या डोळ्यांचें साफल्य झालें असें त्यास वाटलें. पण एकदम आंत जाणें बरें नाहीं असा विचार करून तो कान देऊन त्यांचा मनमोकळे-पणानें चाललेला संवाद ऐकत तेथेंच उभा राहिला.

**प्रियंवदा**—गडे शकू, आतांशा तुझें मन ठिकाणावर नसल्या-सारखें दिसतें. दिवसेंदिवस तूं जास्त जास्त क्षीण होत चालली आहेस तुला होतं तरी काय? त्या- त्या- त्या दिवसापासून-

**शकु०**—काय सांगूं तुम्हांला?

**सख्या**—हें बघ, मायेच्या माणसांना दुःखाचे वाटेकरी केलें म्हणजे आपलें दुःख थोडेंसें हलकें होतें.*

**शकु०**—गडे सांगत्येंच तुम्हांला आतां. तपोवनाचें रक्षण करणारा तो राजर्षि दृष्टीस पडल्यापासून माझी........अशी दशा झाली आहे. तरी राजाची कृपा मजवर होईल असें जुळवून आणा.

दुष्यन्ताच्या कानावर ही गोष्ट कशी घालावी हें त्यांस सुचेना. कांहीं वेळानें प्रियंवदेनें एक तोड काढली. ती अशी कीं, शकुन्तले-कडून राजाला एक ‘प्रणयपत्रिका’ लिहवावी व ती राजाच्या हातीं पडेल अशी कांहीं योजना करावी.

प्रियंवदेच्या इच्छेनुरूप शकुन्तलेनें कमळाच्या कोवळ्या पानावर नखांनीं कोरून पत्र लिहिलें व तें आपल्या मैत्रिणींस वाचून दाखविलें. अर्थात् तें राजानें ऐकलेंच व जें ऐकावयास हवें होतें तेंच त्यास ऐकावयास मिळालें. शकुन्तलेच्या मनांत आपण राजाशीं गांधर्व पद्ध-

* स्निग्धजनसंविभक्तं दुःखं सह्यवेदनं भवति ।

तीनें विवाह करावा असें आहे. हें त्याला आतां कळलें. आपल्याकरितां शकुन्तलेला फार तळमळ लागली आहे व आतां आपण तिची उपेक्षा करणें योग्य होणार नाहीं असें जाणून तो पुढें होऊन अचानक मुलींच्या समोर गेला. त्याला पाहून शकुन्तला लाजत लाजत उभी राहिली आणि अनसूया व प्रियंवदा कांहींतरी निमित्त काढून तेथून निघून गेल्या.

नंतर परस्परांच्या आणाभाका होऊन दुष्यन्त आणि शकुन्तला यांचें गांधर्वविधीनें लग्न झालें मग दुष्यन्तराजा हस्तिनापुरास परत आला.

---

## भाग २ रा

अशा रीतीनें गांधर्वविवाह होऊन शकुन्तलेला अनुरूप पति मिळाला म्हणून तिच्या सख्यांना समाधान वाटलें पण त्याबरोबरच कण्वबाबा सोमतीर्थाहून परत आल्यावर काय म्हणतील याची त्यांना अमळ काळजी वाटूं लागली! तसेंच दुष्यन्त राजधानीस जाऊन बरेच दिवस लोटले तरी त्याच्याकडून आपणांस न्यावयास माणसें कां येत नाहींत याची शकुन्तलेला चिंता वाटूं लागली. इतक्यांत तिसराच एक अनिष्ट प्रकार घडून आला. दुर्वास नामक ऋषि एकाएकीं दाराशीं येऊन दत्त म्हणून उभे राहिले! “कोण आहे आंत? मी आलों आहें.” अशी त्यांनीं हांक मारिली; पण शकुन्तलेच्या मनांत दुष्यन्ताविषयींचे विचार घोळत असल्यामुळें तिचें चित्त ठिकाणीं नव्हतें; यामुळें तिला त्यांची हांक ऐकूं आली नाहीं व तिच्या हातून त्यांचा कांहींच आदरसत्कार घडला नाहीं. याचा परिणाम असा झाला कीं, त्या ऋषिवर्यांना अत्यंत क्रोध येऊन ‘जा, ज्याचें

तूं चिंतन करीत आहेस त्याला तुझें स्मरण होणार नाहीं' असा शाप देऊन ते त्याच पावलीं तडक परत फिरले.

या वेळीं अनसूया व प्रियंवदा जवळच बागेमध्यें फुलें वेंचीत होत्या. शीघ्रकोपी दुर्वासाची शापवाणी कानी पडतांच त्यांच्या पोटांत धस्स झालें. लगेंच प्रियंवदा लगबगीनें त्यांजकडे गेली व त्यांना पदर पसरून म्हणाली 'भगवन्, शकुन्तला ही आपल्या मुलीसारखी आहे, आणि त्यांतून हा तिचा पहिलाच अपराध. म्हणून तिला एकवार क्षमा करावी.' प्रियंवदेच्या या मधुर भाषणानें दुर्वासाचा कोप किंचित् निवाला व तो म्हणाला, 'माझे शब्द कालत्रयीं खोटे व्हाव-याचे नाहींत. मी बोललों तें बोललों. पण एखादी आंगठीसारखी खूण त्याच्या दृष्टीस पडली तर शाप नाहींसा होईल.'

'एवढा तरी उश्शाप मिळाला, हें काय थोडें झालें?' असें वाटून त्या सख्यांना जरासा धीर आला. कारण दुष्यन्तानें जातेवेळीं शकु-न्तलेच्या बोटांत आपलें नांव कोरलेली आंगठी घातली होती हें त्यांना ठाऊक होतें व तो उपाय शकुन्तलेच्या हातांतच आहे हा विचार त्यांच्या मनांत आला. तथापि शकुन्तलेला काळजी वाटूं नये म्हणून त्यांनीं तिला किंवा दुसऱ्या कोणास या शापवृत्तांताचा मागमूसहि लागूं दिला नाहीं.

त्याच दिवशीं कुलपति प्रवासाहून परत आले ते अग्निशाळेंत शिरतांच आकाशवाणी झाली, ती अशी; 'दुष्यन्त आणि शकुन्तला यांचा गांधर्वविवाह झाला असून शकुन्तला गर्भवती आहे.' हें ऐकून आपल्या मनाजोगती गोष्ट घडून आली म्हणून कण्वांना अत्यानंद झाला व त्यांनीं शकुन्तलेकडे जाऊन तिला पोटाशीं धरून म्हटलें, 'बाळे, मी मोठा दैववान आहें. अनायासें तुला योग्य पति लाभला. धुरानें डोळे व्याकुल झाले असतांहि यजमानाची आहुती नेमकी

१ धूमाकुलितदृष्टेर्यजमानस्य पावक एवाहुतिः पतिता ।

अग्नींत पडली, चांगल्या शिष्याला विद्या दिली म्हणजे तिच्याबद्दलची काळजी नसते, तशीच तुझीहि मला चिंता करण्याचें आतां कारण राहिलें नाहीं. आजच तुला सासरीं पाठवितों, अरें !"

दोघे शिष्य व गौतमी नांवाची एक वृद्ध स्त्री यांस शकुन्तलेबरोबर धाडण्याचें ठरलें. प्रियंवदा व अनसूया यांनीं तिला रेशमी वस्त्रांनीं, रानफुलांनीं व तपोवनांतील अलंकारांनीं शृंगारलें. तिनें वडिलांना नमस्कार केला; तेव्हां 'तुला चक्रवर्ती पुत्र होवो' असा कण्वांनीं आशीर्वाद दिला. आश्रमांतल्या हरिणांचा, त्यांच्या पाडसांचा व वृक्षवेलींचासुद्धां शकुन्तलेनें प्रेमानें सद्गदित होऊन निरोप घेतला.

नंतर सर्व मंडळी तिला पोहोंचविण्यास निघाली. आप्तजनाला पाण्यापर्यंत पोंचवावें असें शास्त्र सांगतें. त्याप्रमाणें सर्वजण आश्रमालगतच्या तलावाजवळ वटवृक्षाच्या सावलींत थांबले. तेथें कण्वांनीं शकुन्तलेला सासरीं कसें वागावें याविषयीं उपदेश केला. ते म्हणाले, "बाळे, सासरीं गेल्यावर वडील माणसांची सेवा करीत जा. कांहीं झालें तरी पतीच्या मर्जीविरुद्ध जाऊं नकोस. नोकरांचाकरांशीं प्रेमानें वाग व ऐश्वर्याचा गर्व वाहूं नकोस."

शकुन्तलेच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. ती आपल्या सख्यांना कडकडून भेटली. त्यांनाहि तिचें वियोगदुःख असह्य झालें. आपल्या मैत्रिणीला परत निरोप देतांना त्यांनीं तिच्या कानांत असें सांगून ठेविलें कीं, तेथें गेल्यावर यजमानांनीं यदाकदाचित् तुला ओळखलें नाहीं, तर तुला दिलेली आंगठी दाखीव म्हणजे झालें. तें ऐकून शकुन्तला म्हणाली, 'या तुमच्या शंकेनें माझा बाई थरकांप होत आहे.' त्यावर सख्यांनीं उत्तर केलें 'अतिप्रेमानें नाहीं नाहीं तेंच मनांत येतें.[२] तूं अगदीं भिऊं नकोस.' तथापि शकुन्तलेचें काळीज धडधडूं लागलें. ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. कण्वमुनींचाहि कंठ दाटून

---

१ ओदकान्तं स्निग्धो जनोऽनुगन्तव्यः । २ अतिस्नेहः पापशङ्की ।

आला. तथापि त्यांनीं तिचें सांत्वन केलें व सर्व मंडळी जड अंतः-करणानें माघारी फिरली.

इकडे हस्तिनापुरीं दुष्यंतराजा न्यायमनसुबाचीं कामें आटो-पून विश्रांति घेत असतां, कण्वमहर्षीकडून कोणी शिष्य आले आहेत व ते महाराजांस भेटूं इच्छितात अशी कंचुकीनें वर्दी दिली. तेव्हां राजानें पुरोहितास असा निरोप पाठविला कीं, या आश्रमवासी तपस्व्यांचें यथोचित स्वागत करून त्यांना स्वतःच घेऊन मजकडे यावें आणि तपस्विजनांचें दर्शन घेण्यास योग्य असें स्थळ म्हणजे यज्ञशाला. होय. असें जाणून दुष्यन्त तेथें जाऊन त्यांची वाट पाहात बसला.

नंतर बुरखा घेतलेली शकुन्तला, गौतमी व दोघे कण्वशिष्य राजा-पुढें येऊन उभीं राहिलीं. आणि कण्व शिष्यांनीं राजाचा जयजयकार केल्यावर दुष्यन्तानें त्यांस वंदन करून विचारलें, ' ऋषिवर्यांनो, भगवान कण्वमुनींची काय आज्ञा आहे ? '

एका शिष्यानें उत्तर दिलें, 'हे राजा, महर्षींचा तुला असा संदेश आहे कीं, तूं गांधर्वविधीनें शकुन्तलेचा स्वीकार माझ्या परोक्ष केला आहेस, तरी हें कृत्य मला संमत असून मी तुम्हां उभयतांचें अभिनंदन करितों. इतर भार्यांप्रमाणें इजवरहि तुझें प्रेम असूं दे. याहून अधिक सांगणें हें वधूच्या आप्तांना उचित होणार नाहीं.'

' ही काय बुवा भानगड ! काय म्हणतां ? हिचें मीं पूर्वी पाणि-ग्रहण केलें आहे ? मी आठवण कर करून पाहतों आहें, पण मला तर मुळींच स्मरत नाहीं.' असे दुष्यन्तानें साश्चर्यमुद्रेनें उद्गार काढले.

हे शब्द कानावर पडतांक्षणींच ' आपल्या कानांत कोणी कढत तेल तर ओतीत नाहीं ना ?' अशी शकुन्तलेची अवस्था झाली. 'माझा उजवा डोळा कां बरें लवतो आहे?' असें ती मनाशीं म्हणाली. तिच्या मुखावरील बुरखा दूर केल्यास लवकर ओळख पटेल असें समजून

गौतमीनें शकुन्तलेच्या तोंडावरील अवगुंठन बाजूस सारलें. तरीहि राजाला तिची ओळख पटेना !

शेवटीं एका शिष्यानें तिला सांगितलें कीं, 'शकुन्तले, यांना खूण पटेल असें कांहींतरी उत्तर दे.'

शकुन्तलेनें बोट चाचपून पाहिलें तेव्हां ती चपापली. 'आं हें काय झालें बाई ? माझ्या बोटांतली आंगठी कुठं गेली ?' असे दुःखोद्गार काढून ती केविलवाण्या मुद्रेनें गौतमीकडे पाहूं लागली. तेव्हां गौतमीबाई घाईघाईनें मध्येंच म्हणाल्या, 'शकुन्तले, आपण इकडे येतांना वाटेंत शक्रघाटावर शचीतीर्थाला वंदन करण्याकरितां तूं पाण्यांत उतरली होतीस, त्याच वेळीं तेथें तुझी आंगठी खास गळून पडली असली पाहिजे.'

**राजा**–( स्मितपूर्वक) वा: ! [1]स्त्रियांची समयसूचकता कांहीं और असते असें म्हणतात, तें आज पुरें प्रत्ययाला आलें. वेळ मारून नेण्याच्या कामीं त्या मोठ्या पटाईत असतात. शकुन्तला शुद्ध खोटें बोलून आमच्यावर उगीच आळ आणीत आहे.

**गौतमी**--महाभागा, काय बरें हें बोलणें ? आपणांस हें शोभतें का ? आमच्या मुलीला कपट हा पदार्थच ठाऊक नाहीं. ही तपोवनांत वाढलेली साधी भोळी मुलगी आहे.

**शकुन्तला**– ( रागानें ) अनार्या, स्वतःच्या मनावरून दुसऱ्याची परीक्षा करितोस काय ?

**शिष्य**–खासें ! काय हा उलटा न्याय ! काय म्हणे शकुन्तले-सारखी भोळीभाबडी मुलगी खोडसाळ ! व जन्मापासून ज्यांना दरबारांत धूर्तपणाचें शिक्षण मिळालेलें आहे असे हे राजे सच्चे !! हा उलटा न्याय नव्हे काय ?

**राजा**--अहो,मी हिचा पति नसतां उगीच कसा हिचा स्वीकार करूं ?

१ इदं तत्प्रत्युत्पन्नमति स्त्रैणमिति यदुच्यते ।

शिष्य—राजा, तूं हिचा स्वीकार कर किंवा त्याग कर. शकुन्तले, तुला आतां घरीं नेणेंहि युक्त नाहीं. तूं येथें राजवाड्यांत राहून दास्य पत्करलेंस तरी चालेल.

अखेरीस निरुपाय झाल्यामुळें शकुन्तलेस तेथेंच ठेवून ऋषिकुमार गौतमीस पुढें घालून परत फिरले.

शकुन्तला ढळढळां रडूं लागली. राजाचे पुरोहित तिला राजाच्या अनुमतीनें आपल्या घरीं घेऊन चालले, तों काय चमत्कार सांगावा! अंतरिक्षांतून एक अप्सरा विद्युद्वेगानें त्यांच्या वाटेवर आली व शकुन्तलेला उचलून घेऊन क्षणार्धांत अदृश्य झाली !!

ही अद्भुत गोष्ट पुरोहितांनीं राजास सांगितली तेव्हां त्यास अत्यंत आश्चर्य वाटलें. ‘ शकुन्तला म्हणते तें खरें असेल काय ? ’ अशी अंधुक शंका त्याच्या मनांत येऊन त्यास एक प्रकारची हुरहुर लागली.

इकडे शचीतीर्थांत शकुन्तलेच्या बोटांतून तिला न कळत जी आंगठी निसटून पडली तिचें पुढें काय झालें बरें ? ती एका माशानें गिळली. तो मासा एका कोळ्याच्या जाळ्यांत सापडला. आणि तो मासा चिरून त्याचे तुकडे करीत असतां ती रत्नासारखी चमकणारी आंगठी त्याच्या पोटांतून बाहेर पडली. नंतर ती विकून टाकण्याकरितां तो धीवर बाजारांत फिरत असतां राजाच्या शिपायांनीं त्याला संशयावरून पकडलें. आणि कोतवालानें आंगठीवर खोदलेलें दुष्यन्ताचें नांव पाहून ती त्यास नेऊन दाखविली.

आंगठी नजरेस पडतांच राजाचे डोळ पाण्यानें भरून येऊन मागील सर्व गाष्टाच त्यास भराभर स्मरण होऊं लागलें. पण आतां नुसती आठवण होऊन काय उपयोग ? त्यानें ती आंगठी ठेवून घेतली व शिपायांच्या अपेक्षेप्रमाणें त्या धीवरास शासन न करतां त्यास आंगठीच्या मोलापेक्षां अधिक पारितोषिक देऊन सोडून दिलें.

शकुन्तलेचा निष्ठुरपणानें अव्हेर केल्याबद्दल आतां राजाला पश्चात्ताप होऊं लागला. त्याचें मन त्यास खाऊं लागलें. काय करावें हें त्यास सुचेना. नित्याच्या कामकाजाकडे त्याचें पूर्ववत् लक्ष लागेनासें झालें. त्यानें प्रतिवर्षी होणारा वसंतोत्सव बंद ठेवण्याची आज्ञा केली. आणि राजाचें सामर्थ्य एवढें मोठें कीं, ही त्याची आज्ञा वसंतऋतूंतील वृक्षांनीं व त्यांच्यावरील पाखरांनींहि पाळली ! आम्रवृक्षांना मोहोर येईना, कीं कोकिलांचें कूजन कानीं पडेना !

अशा रीतीनें राजाचा कांहीं काळ चिंतनेंत गेल्यावर इंद्राचा सारथी मातली दुष्यन्ताकडे येऊन म्हणाला, 'महाराज, दुर्जय नामक राक्षस फार मातला आहे म्हणून महेंद्रानें आपणांस मदतीस बोलाविलें आहे.'

"इंद्रमहाराजांची ही मजवर कृपाच झाली असें मी समजतों. त्यांची आज्ञा मला शिरसावंद्यच होय." असें म्हणून दुष्यन्त मातली-बरोबर रथांत बसून इंद्रलोकीं निघून गेला.

इकडे शकुन्तलेला एका अप्सरेनें उचलून जी नेली ती गंधर्व-लोकींच्या हेमकूट पर्वतावरील मारीचऋषींच्या आश्रमांत नेऊन ठेवली. ही अप्सरा म्हणजे प्रत्यक्ष शकुन्तलेची माता मेनकाच होय. तिचें या तपोवनांतील एका अप्सरेशीं नातें होतें म्हणून तिनें आपल्या मुलीस बाळंतपणासाठीं तेथें नेऊन ठेविलें होतें.

कांहीं दिवसांनीं शकुन्तला प्रसूत होऊन तिला पुत्ररत्न झालें. कण्वमुनींनीं आशीर्वाद दिल्याप्रमाणें तो मुलगा चक्रवर्ती राजाच्या सर्व लक्षणांनीं युक्त होता. आश्रमांतील सर्व प्राण्यांना तो ताब्यांत ठेवितो हें पाहून भगवान् मारीचांनीं त्याचें 'सर्वदमन' असें नांव ठेविलें. त्याला कशाचीच भीति वाटत नसे. लहानपणींच तो सिंहाच्या छाव्याशीं खेळे. सिंहीण आपल्या छाव्याला पाजीत असतांनासुद्धां तो तिच्या छाव्याला पितां पितां ओढीत असे व त्याचा

जबडा उघडून म्हणे, 'आ कर पाहूं! तुला किती दात आले आहेत ते मला मोदूं दे.'

अशा रीतीनें सर्वदमनाचे दिवस जरी आनंदांत जात होते तरी बिचारी शकुन्तला मात्र दुःखानें कसाबसा काळ कंठीत असे.

इकडे दुष्यन्तानें दानवांचा पराभव करून दुर्जयाचा वध केला. त्याबद्दल इंद्रानें सर्व देवांच्या समक्ष आपल्या अर्ध्या आसनावर त्यास बसवून स्वतःच्या कंठांतील मंदारपुष्पमाला त्याच्या गळ्यांत घातली. नंतर रथांत आरूढ होऊन राजा व मातली आकाशमार्गानें भूलोकावर यावयास निघाले. वाटेंत त्यांना देवगुरु मारीच मुनींचा रमणीय आश्रम लागला. तेथील तपोधनांचें दर्शन घेण्याकरितां दुष्यन्त आश्रमांत पाऊल टाकतो तोंच एक विस्मयकारक देखावा त्याच्या नजरेस पडला. एक लहान मुलगा सिंहाशीं खेळत आहे व कोणीएक तापसी धाकदपटशा दाखवून त्याला निवारीत आहे. त्या खोडकर मुलाला पाहून राजाचें मन त्याच्याकडे गेलें. म्हणून तो त्यास जवळ घेऊन कुरवाळूं लागला. तेव्हां 'काय? याच्या हातावर सार्वभौमत्वाचीं चिन्हेंहि आहेत' असें तो स्वतःशींच पुटपुटला. तो मुलगासुद्धां बिचकून न जातां अगदीं मुकाट्यानें त्याच्याजवळ बसला. आणि दुष्यन्तालाहि स्वतःच्या मुलास जवळ घेतल्यासारखें स्पर्शसुख वाटूं लागलें. मग त्यानें तापसीला विचारलें, 'हा कोणाचा मुलगा बरें?'

'एका अप्सरेच्या मुलीचा.'

'याच्या वडिलांचें नांव काय?'

'धर्मपत्नीचा त्याग करणाऱ्याच्या नांवाचा कोण मेला उच्चार करील? त्या दुष्ट राजाचें नांव तोंडावाटे काढून कोण आपली जीभ विटाळील?'

'हें प्रकरण मलाच चिकटूं पाहत आहे' असें राजा मनाशीं



**सर्वदमन**—आ कल् पाहूं ? तुला किती दांत आले आहेत ते मला मोदूं दे. (पृ. १४)

म्हणाला आणि त्याबरोबरच त्याच्या हृदयांत आशेचा एक अंकुर उद्भवला.

इतक्यांत दुसरा एक चमत्कार घडून आला. सर्वदमनाकडे पाहून एक तापसी ओरडून म्हणाली, 'अगबाई ! ह्याच्या मनगटांतला ताईत काय झाला ?'

'घाबरूं नका, बाई, घाबरूं नका ! हा पहा तो ताईत.' असें म्हणून खालीं जमिनीवर पडलेला ताईत दुष्यन्तानें उचलून घेऊन त्यांना दाखविला व म्हटलें, 'हा बालक सिंहाच्या छाव्याला बुकलीत असतांच तो त्याच्या हातांतून गळून पडला.'

'नका, नका, त्याला स्पर्शहि करूं नका. भगवान् मारीचांनीं तो जातकर्माच्या वेळीं त्याच्या हातांत बांधलेला आहे. आईबाप किंवा मुलगा ह्यांच्याशिवाय इतर कोणी त्याला हात लावला तर त्याचा साप होऊन तो हात लावणारास डसतो.'

पूर्वीं कितीतरी वेळां या ताइताचा साप झाला होता, पण या वेळीं मात्र तो तसाच राहिला हें पाहून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. राजास मात्र हर्ष होऊन 'ये बाळ,' म्हणून त्यानें मुलास पोटाशीं घट्ट धरलें. तेव्हां तो मुलगा म्हणाला, 'छोला मला, माझा बाप दुष्यन्त लाजा. तुम्ही नाहीं कांहीं !'

इतक्यांत शकुन्तला तेथें आली. पतिपत्नींची दृष्टादृष्ट होऊन परस्परांना ओळख पटल्यावर जो आनंद झाला तो कोठवर वर्णावा ! 'आर्यपुत्राचा जयजयकार—' असें अर्धेंच बोलून कंठ दाटून आल्यामुळें शकुन्तलेला पुढें बोलवेना.

राजा गहिंवरून तिच्या पायां पडूं लागला. तेव्हां तिनें म्हटलें, 'हें काय भलतेंच ? हा काय माझा अधिकार ? पण या अभागिनीची आठवण इकडे कशी झाली ?'

"तुझ्या बोटांतून गळून पडलेली ही आंगठी सांपडली तेव्हांच

माझी स्मृति जागृत झाली." असें म्हणून दुष्यन्त आपल्या बोटांतली आंगठी काढून तिला पुनः देऊं लागला. तेव्हां तिनें म्हटलें, 'हीच ती आंगठी! हिनें मला एकदां दगा दिला. आतां मी हिच्यावर मुळींच विश्वास ठेवणार नाहीं. ती आपली आपल्यालाच लखलाभ होवो! ती आपल्याच बोटांत असूं द्यावी.'

नंतर तिघेंहि भगवान् मारीचमुनींना वंदन करण्यास गेलीं. कण्व-महर्षींना व मारीचऋषींना हा सर्व वृत्तान्त जसजसा घडला तसतसा अंतर्दृष्टीनें पूर्वींच कळला होता. दुष्यन्तास मारीच म्हणाले, 'हा सर्व-दमन पुढें दिग्विजय करून प्रजेचें पालन, पोषण व भरण करणारा होणार असल्यामुळें 'भरत' या नांवानें प्रसिद्धीस येईल.

मग मुनींचा आशीर्वाद घेऊन पत्नी व पुत्र यांसह दुष्यन्त हस्तिनापुरीं परत गेला व तेथें त्यानें सुखानें राज्य केलें.

मुलांनो, या भरताबद्दलच आपल्या देशास भरतखंड* असें नांव पडलें, हें आतां तुमच्या लक्षांत आलें ना?

---

*भरतखंडाच्या नांवासंबंधीं हें वृत्त प्रसिद्ध आख्यायिकेस धरून आहे. परंतु श्रीमद्भागवतामध्यें ऋषभपुत्र भरताच्या नांवावरून भरतखंड हें नांव आलें असेंहि स्पष्ट म्हटलें आहे.

# कालिदासकृत विक्रमोर्वशीय*

## पात्रें

**पुरूरवा**-एक राजा
**उर्वशी**-एक अप्सरा, पुरूरव्याची पत्नी
**चित्रलेखा**-उर्वशीची सखी
**चित्ररथ**-एक गंधर्व, इंद्राचा सेवक
**माणवक**-पुरूरव्याचा मित्र
**आयु**-पुरूरवा व उर्वशी यांचा पुत्र
**कंचुकी**-अंतःपुराधिकारी वृद्ध ब्राह्मण
**इंद्र**-देवांचा राजा.
**नारद**-देवर्षि

### भाग १ ला

"धांवाहो धांवा; मरतों मरतों, आम्हांला सोडवा" असे कोमल व केविलवाणे शब्द एका राजाच्या कानीं पडले. तेव्हां तो पुढें येऊन पाहतो तों कांहीं अप्सरा आक्रोश करतांना त्याच्या दृष्टीस पडल्या.

"रडूं नका, रडूं नका; बायांनो, तुम्हांस कोण त्रास देत आहे? कोणापासून तुमची सुटका करावयाची?" असें राजानें त्यांस विचारतां, त्यांच्यापैकीं मेनका नांवाची एक अप्सरा पुढें होऊन म्हणाली, "आम्ही सर्वजणी कुबेराकडून परत येत असतां केशी नांवाच्या राक्षसानें स्वर्गाचें भूषण अशा उर्वशीला व तिच्या सखीला हिरावून नेलें."

"असें काय! हा आतां आणतों त्यांना सोडवून. भिऊं नका, तुम्ही अगदीं निर्धास्त असा," असें त्यांना आश्वासन देऊन पुरूरवा नांवाच्या त्या राजानें ज्या दिशेस राक्षस पळाला होता त्याच दिशेस रथ हांकण्यास सारथ्यास आज्ञा केली.

* ज्यांत नायकास विक्रमानें म्हणजे पराक्रमानें उर्वशी मिळाली आहे तें. हें नांव देण्यांत आपल्या आश्रयदात्या विक्रमादित्याचेंहि नांव अमर करण्याचा कालिदासाचा हेतु असावा.

मेनकाप्रभृति अप्सरा जवळच असलेल्या हेमकूट पर्वताच्या शिखरावर जाऊन उर्वशीची वाट पाहत बसल्या.

इकडे पुरूरव्यानें केशी राक्षसाचा पराभव करून उर्वशी व चित्रलेखा यांची मुक्तता केली. त्या वेळीं उर्वशी अगदीं भयभीत होऊन मूर्च्छित झाली होती. तिला चित्रलेखेनें उजव्या हातावर सावरून धरलें होतें. कांहीं वेळानें सावध होऊन तिनें डोळे उघडले; राजाची व तिची दृष्टादृष्ट होतांच, 'या दानवानें माझ्यावर मोठा उपकारच केला! त्यानें हें नररत्न माझ्या दृष्टीस पाडलें!" असें ती मनांत म्हणूं लागली. तिला पाहतांच राजाचेंहि मन तिच्यावर बसलें.

मग त्यानें तिला सखीसहवर्तमान हेमकूटावर आणून इतर अप्सरांच्या स्वाधीन केलें. त्या वेळीं त्यांनीं राजाचा जयजयकार करून त्यास धन्यवाद दिला.

इतक्यांत उर्वशीला केशी दानवानें पकडल्याची वार्ता नारदाकडून इंद्रास कळल्यामुळें त्यानें तिची सुटका करण्याकरितां चित्ररथगंधर्वास पाठविलें होतें, तोहि तेथेच आला. तेव्हां "आपण इंद्राची मोठी कामगिरी केलीत" असें म्हणून चित्ररथानें राजाचें अभिनंदन केलें व त्यास इंद्रदर्शनार्थ येण्यास विनती केली.

यावर राजा म्हणाला, "मी यांत काय मोठेंसें केलें आहे? वज्रधारी इंद्राच्या पराक्रमाचेंच हें फळ होय! सिंहगर्जनेचा गिरिगव्हरांत उमटलेला पडसादसुद्धां हत्तींच्या कळपाची दाणादाण उडवितो! तद्वतच हा प्रकार. चित्ररथा, मी आपल्या महाराजांकडे आलों असतों, पण या प्रसंगीं तिकडे येणें मला योग्य वाटत नाहीं; शिवाय मला फुरसदहि नाहीं आपणच उर्वशीला इंद्रलोकीं पोहोंचवावें."

हें ऐकून चित्ररथ गंधर्व स्वर्गलोकीं जावयास निघाला. उर्वशीस मात्र तेथून हलूच नये असें वाटूं लागलें. पण काय करणार?

---

१ वसुधाधर कंदराभिसर्पी प्रतिशब्दोऽपि हरेर्भिनत्ति नागान्।

दु:खाचा दीर्घ सुस्कारा टाकून ती मोठ्या कष्टानें इंद्रलोकीं जावयास निघाली. जातां जातां राजाच्या मुखाकडे आपणांस कांहीं वेळ तरी पाहावयास मिळावें, म्हणून आपल्या गळयांतली माळ वेलीमध्यें अडकल्याचा बहाणा करून तिनें आपली हौस पुरवून घेतली.

इकडे नगराला परत आल्यावर राजाच्या मनाला हुरहुर लागली. तो सचिंत व उदास दिसूं लागला. त्याच्या खिन्न मुद्रेचें कारण पट्टराणीच्या कानावर गेलें. तें असें. पट्टराणीची निपुणिका नामक एक दासी होती. ती बातम्या काढण्यांत खरोखरच निपुण होती. तिनें राजाच्या माणवक नांवाच्या भोळसट मित्राकडून राजाचें मन उर्वशीवर जडल्याची बातमी युक्तीनें काढून राणीला कळविली.

एके दिवशीं पुरूरवा माणवकास बरोबर घेऊन मन रिझविण्यासाठीं प्रमदवनांत गेला. वसंतऋतूला नुकताच प्रारंभ झाला असल्यामुळें उद्यान रम्य व मनोहर दिसत होतें. पण राजाचें मन तेथेंहि रमेना.

" मित्रा, माझी इच्छा सफल होईल का ? उर्वशी प्राप्त करून घेण्याचा कांहींतरी उपाय शोधून काढ रे ! " असे राजा माणवकास म्हणाला.

याचा माणवक डोळे मिटून विचार करूं लागला, तोंच उर्वशी व चित्रलेखा एकाएकीं स्वर्गांतून तेथे उतरल्या. कोणास न दिसण्याची विद्या त्यांना अवगत असल्यामुळें तेथेंच त्यांचा संवाद ऐकत त्या गुप्तपणें उभ्या राहिल्या.

"हं ! मी काढला उपाय शोधून." "काय ? काय ? सांग, सांग, लवकर साग."

" त्यांत काय ! उर्वशीचें चित्र काढून पाहत बैस."

"छे, छे, तें शक्य नाहीं. कारण, बाबा रे, चित्र संपण्यापूर्वींच माझे डोळे पाण्यानें भरून येतात व अश्रुबिंदू वर पडून चित्राची खराबी होते !"

पुरूरव्याच्या एकेका शब्दाबरोबर उर्वशीच्या हृदयसागरास भरती येत चालली होती, आपलें प्रेम व्यक्त करण्याकरितां तिनें एका भूर्जपत्रावर प्रेमपत्रिका लिहून राजाच्या पुढें टाकली.

'हें काय ?' असें म्हणून राजानें तें पत्र हातांत घेऊन वाचलें. त्याचा आनंद गगनांत मावेना ! त्यानें तें पत्र मित्रास पुनः वाचून दाखवून 'हा माझा ठेवा जपून ठेव' असें म्हणून माणवकापाशीं तें दिलें.

आपण प्रकट होण्यास हा समय उत्तम आहे असें समजून, भीत भीत पुढें येऊन उर्वशीनें म्हटलें, 'महाराजांचा जयजयकार असो !'

इतक्यांत आकाशवाणी झाली—

"चित्रलेखे, उर्वशीस घेऊन सत्वर चल; इन्द्रसभेपुढें नाट्यप्रयोग करावयाचा आहे."

ही आकाशवाणी ऐकून मोठ्या दुःखानें राजाचा निरोप घेऊन, जड अंतःकरणानें, त्याच्याकडे पाहात पाहात उर्वशी निघून गेली !

आतां पत्र वाचून तरी आपण आपली करमणूक करून घ्यावी असें राजानें योजून 'पत्र कोठें आहे' म्हणून माणवकास विचारलें. पण पत्र जागेवर कोठें होतें ? माणवकाच्या हातून तें हरवलें. व उडत उडत जाऊन तें अगोदरच राणीच्या हातीं पडलें होतें.

राणी तें पत्र घेऊन पुरूरव्यास भेटण्याकरितां येत आहे तों राजा इकडेतिकडे पत्रच शोधतांना तिला दिसला. "आर्यपुत्र, ज्याचा आपण शोध चालविला आहे, तें हें पत्र घ्या, व कृतकृत्य व्हा," असें खोंचदार भाषण करून तिनें तें पत्र राजाच्या पुढें भिरकावून दिलें.

हा सर्व प्रकार पाहून राजा अगदीं खजील झाला व मुद्देमालासहित पकडलेल्या चोराप्रमाणें काय उत्तर द्यावें हें त्यास समजेना. तो गडबडला. "मी या पत्राचा शोध करीत नव्हतों," असें म्हणून तो राणीची कशीबशी समजूत करूं लागला. पण यानें तिची काय समजूत पडणार? 'ही मी चाललें—' असें म्हणून ती फणकाऱ्यानें निघून गेली !—

इकडे स्वर्गातील रंगभूमीवर प्रत्यक्ष सरस्वतीनें रचलेलें नाटक चाललें असतां उर्वशीच्या हातून एक मजेदार चूक झाली, ती अशी—

लक्ष्मीची भूमिका उर्वशीला देण्यांत आली होती. तिला वारुणीची भूमिका घेणाऱ्या मेनकेनें विचारलें, "येथें सर्व देव स्वयंवरार्थ जमले आहेत, त्यांपैकीं तुझें मन कोणावर जडलें आहे?" तिचें मन ठिकाणावर नसल्यानें पुरुषोत्तमावर असें म्हणण्याऐवजीं 'पुरूरव्यावर' असे शब्द चुकून तिच्या तोंडून बाहेर पडले!

यामुळें ज्यांच्या देखरेखीखालीं हा खेळ चालला होता ते नाट्याचार्य भरतमुनि रागावले व त्यांनीं शाप दिला— 'उर्वशी, स्वर्गात राहण्याची तुझी पात्रता नाहीं, जा तूं मृत्युलोकीं पतित हो!!'

खेळ संपल्यावर उर्वशी लाजेनें खालीं मान घालून उभी राहिली. तिला पाहून इंद्रानें म्हटलें "पुरूरव्यानें मजवर अनंत उपकार केले आहेत; मलाहि त्याच्या उपकाराची फेड करावयाची आहे. तर तूं आपल्या इच्छेप्रमाणें पुरूरवा राजाच्या सेवेला सादर हो. तुला त्याच्यापासून पुत्र होईल. व राजाला पुत्रमुखदर्शन झालें म्हणजे तुला पुन्हा स्वर्गलोकीं येण्यास सांपडेल."

इंद्राज्ञेप्रमाणें उर्वशी चित्रलेखेसह पुरूरव्याची राजधानी जें प्रतिष्ठानपुरी नामक नगर तेथें आली. राजा विरहानें व्याकुळ होऊन त्या वेळीं मित्राशीं आपल्याविषयींच गोष्टी बोलत आहे असें जाणून, ते काय बोलतात हें ऐकण्यासाठीं ती तेथें पूर्ववत् गुप्तपणानें उभी राहिली.

या अवधींत पूर्वी घडलेल्या प्रकाराबद्दल पश्चात्ताप पावून पुरूरव्याची महाराणी त्याची मनधरणी करण्याकरितां तेथें आली, आणि हात जोडून म्हणाली, "चंद्ररोहिणींना साक्षी ठेऊन आपणांस आश्वासन देतें कीं, इतःपर आर्यपुत्रास मजकडून यत्किंचित् उपरोध होणार नाहीं; आपणांस प्रिय असलेल्या स्त्रीशीं मी मैत्रिणीप्रमाणें वागेन."

हें राणीचें बोलणें ऐकून माणवकभटजीनें बाजूस तोंड करून म्हटलें, 'जाळें तोडून मासा निसटला म्हणजे कोळ्यानें कष्टी होऊन म्हणावें, "जाऊं द्या! तेवढेंच पुण्य घडलें," तशांतलाच हा प्रकार म्हणावयाचा!'

नंतर राणी तेथून निघून गेली असें पाहून 'आतां विलंब कां?' असें मनाशीं म्हणून एकदम उर्वशी राजाच्या पुढें येऊन उभी राहिली.

मग काय! आपला इष्ट हेतु सफल झालेला पाहून राजा हर्ष-भरित झाला. त्याच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले!

आपल्या मैत्रिणीचे मनोरथ पूर्ण झालेले पाहून तिची अनुज्ञा घेऊन चित्रलेखा स्वर्गलोकीं निघून गेली.

---

## भाग दुसरा

कांहीं दिवसांनीं प्रधानाकडे राज्यकारभार सोंपवून पुरूरवा उर्व-शीसह गंधमादनवनांत विहार करावयास गेला. त्या वनांतील एका भागास कुमारवन अशी संज्ञा होती. कुमार म्हणजे पार्वतीचा मुलगा कार्तिकस्वामी. याला बायकांचा फार राग. त्याचा या प्रदेशाला असा शाप होता कीं, जी कोणी स्त्री येथें पाऊल टाकील ती ताबडतोब लता बनेल.

उर्वशी फिरत फिरत चुकून याच वनांत आली, व लगेच तेथल्या तेथेंच लता बनून राहिली! मग राजाची अवस्था काय सांगावी? ती एकाएकीं नाहींशी झाल्यामुळें तो अगदीं वेडा होऊन रात्रंदिवस प्रियतमेचा शोध करीत इतस्ततः भटकूं लागला. वाटेंत जो कोणी त्यास दृष्टीस पडेल त्यास तो आपल्या प्रियेचें वृत्त पुसूं लागला.

---

१ छिन्नबन्धे मत्स्ये पलायिते निर्विण्णो धीवरो भणति 'धर्मो मे भविष्यति' इति ।

मोर, कोकीळ, राजहंस, चक्रवाक, भ्रमर, हत्ती, हरीण इत्यादि प्राणी त्यास वाटेंत भेटले. सर्वांस त्याचें विचारणें एकच होतें. तो हंसास म्हणाला, 'अरे हंसा, दे माझी बायको. तूं तिची चालण्याची ढब चोरली आहेस. यावरून तुझ्याजवळच ती असली पाहिजे.'

अशा प्रकारें विरहानें विव्हळ होऊन नाना पशुपक्ष्यांस त्यानें प्रश्न विचारले. परंतु सर्वत्र त्याची निराशा झाली ! हिंडतां हिंडतां एका शिलेच्या भेगेंत त्याला एक मणी सांपडला. तो अशोक वृक्षाच्या पुष्पाप्रमाणें लाल होता. एका मुनींनें त्यास सांगितलें कीं, "हे राजा, हा संगमनीय नांवाचा मणी आहे. याच्या प्रभावानें तुझा प्रिय-जनाशीं समागम होईल." राजा आनंदित होऊन तो मणी घेऊन इकडे तिकडे पाहात फिरूं लागला. एका लतेकडे बघून आपल्या प्रियेचें सादृश्य त्याला तिच्यांत आढळून आल्याकारणानें त्यानें तीस आलिंगन दिलें, तोंच ती लता लुप्त होऊन तिच्या स्थानीं त्याची प्रिया प्रकट झाली !

मग राजाच्या आनंदास काय पारावार ? तो उर्वशीस म्हणाला, "प्रिये, इतका वेळ तूं कोठें होतीस ? हा काय प्रकार आहे ?" तिनें उत्तर दिलें, "महाराज, मी विस्मरणानें या वनांत शिरलें, व लता होऊन राहिलें; पुढील प्रकार आपणांस विदित आहेच." यावर राजानें "या रत्नानेंच माझी या रत्नाशीं भेट घडवून आणली," असें म्हणून तें उर्वशीस दाखविलें.

तें पाहतांच तिनें "काय? संगमनीय मणी का? हा माझा प्राण-दाताच !" असें म्हणून तो आपणाजवळ ठेऊन घेतला.

नंतर तीं उभयतां राजधानीस परत आलीं.

उर्वशीस घेऊन महाराज फार दिवसांनीं परत आल्यानें प्रतिष्ठान-नगरींतील प्रजाजनांना अत्यानंद झाला. म्हणून त्यांनीं मोठा स्वागतोत्सव साजरा केला.

पुरूरवा पूर्ववत् दक्षतेनें राज्य करूं लागला. त्याला पुत्रसंतान नव्हतें; याव्यतिरिक्त त्याला आतां कशाचीहि वाण नव्हती.

एकदां असें झालें कीं, कांहीं पर्वणीच्या निमित्तानें तो गंगायमुना-संगमावर स्नानास निघाला. बरोबर अंतःपुरांतील स्त्रियाहि होत्या. त्याची एक दासी डोक्यावर टोपली घेऊन चालली होती; तींत संगमनीय मणी ठेवलेला होता. त्याच्यावर रेशमी आच्छादनहि होतें.

इतक्यांत एका गिधाडानें झडप घालून मांसाचा तुकडा आहे असें समजून तो लाल मणी लांबविला!

संगमनीय मणी जसा अवचित प्राप्त झाला, तसा अवचित नष्ट झालेला पाहतांच राजाचें धाबें दणाणलें! तो त्या पक्ष्यास उद्देशून आवेशानें म्हणाला, "अरे चोरा, आतां तुला होतास कीं नव्हतास असें करून टाकतों. माझ्या राज्यांत ही पहिलीच चोरी! आणि ती प्रत्यक्ष राजाच्या घरीं! थांब तुझें भरलेंच म्हणून समज!"

नतर त्यानें त्या रत्नाच्या शोधार्थ रानावनांत शिपाई पिटाळले. कांहीं वेळानें एका वृक्षाच्या ढोलींत तो मणी बाणाला अडकलेला कोणालासा सांपडला. मग एका कंचुकीनें तो राजास आणून दाखविला.

"अरे, हा बाण कुठला? तुला कोठें रे सांपडला?" असे राजानें घाईघाईनें कंचुकीस अनेक प्रश्न विचारले.

"महाराज, त्या गिधाडाला कोणींतरी अचूक बाण मारला. त्या नेमानें तो पक्षी, हा बाण व हा मणी सगळे एकदम खालीं येऊन आदळले!" अशी कंचुकीनें हकीकत सांगितली.

'काय काय,' राजा आश्चर्य करीत म्हणाला, 'कुणाचा बरें हा बाण असावा? तुला ठाऊक आहे?'

'याच्यावर नांव दिसतें आहे! पण आपल्याला नाहीं बुवा वाचतां येत! मला आतांशा कमी दिसतें.' असें कंचुकीनें उत्तर दिलें.

'पाहूं ! पाहूं !' असें म्हणत राजानें तो गडबडीनें आपल्या हातांत घेतला व त्याच्यावरील अक्षरें वाचून पाहिलीं तीं अशीं—

'हा बाण उर्वशी-पुरूरव्याचा आयु नांवाचा जो धनुर्धारी पुत्र त्याचा असून तो शत्रूच्या आयुष्याचा संहार करणारा आहे.'

हीं अक्षरें वाचतांना प्रत्येक शब्दागणिक राजाला आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या! कां बरें? या अक्षरांत अशी काय जादू भरली होती?

त्यानें माणवकास म्हटलें, 'मित्रा, ही गोष्ट प्रियेनें आतांपर्यंत गुप्त कशी ठेवली? मला कां बरें सांगितली नाहीं? मी येथून दूर गेलों होतों तो काय तो नैमिषारण्यांतील यज्ञसत्राकरितांच; त्या अवधींत ती .......'

अशा प्रकारें राजा बोलत आहे तोंच 'च्यवनऋषींच्या आश्रमांतून एक तापसी बरोबर एक मुलगा घेऊन आली आहे; ती महाराजांना भेटावयाचें आहे म्हणते,' अशी वर्दी आली. मग राजाच्या आज्ञेवरून कंचुकी त्या दोघांना आंत घेऊन आला.

तापसीबरोबरच्या त्या कुमाराला दुरूनच पाहून माणवक आश्चर्यानें म्हणाला, 'हाच का तो कुमार? याचेंच नांव बाणावर आहे? काय महाराजासारखाच याचा तोंडावळा आहे! मला वाटतें आपणच बालरूप घेऊन आलां आहांत!'

'हो असेंच खरें. याला पाहतांच मला तर आनंदाश्रू येऊन हृदय वात्सल्यानें भरून आलें आहे. याला केव्हां एकदां पोटाशीं धरीन असें मला झालें आहे.'

नंतर राजानें तापसीला प्रणामपूर्वक विचारलें, 'भगवति, आपलें येथें कां येणें झालें?' तिनें उत्तर दिलें. 'ऐकावें महाराज. या कुमाराचा जन्म झाल्यावर उर्वशीनें कांहीं कारणास्तव तो माझ्या ताब्यांत दिला होता. च्यवनऋषींनीं याचे जातकर्मादि क्षत्रियोचित संस्कार

करून याला धनुर्विद्येंत पारंगत केलें आहे. आज असें झालें कीं, हा आपल्या संवगड्याबरोबर पुष्पें, समिधा व दर्भ आणावयास गेला असतां एका झाडाच्या टोंकावर त्यानें एक गिधाड पाहिलें; त्याच्या चोंचींत एक मांसाचा तुकडा होता. त्याला कुठलें राहवतें? पोराचीच जात. त्यानें अचूक नम धरून गिधाडाला पाडलें! आश्रमाच्या शिस्तीला हें कांहीं धरून नाहीं. च्यवनऋषींच्या कानीं हा वृत्तान्त गेला तेव्हां ते मला म्हणाले, 'तूं ही उर्वशीची ठेव तिची तिला परत कर कशी. जा पाहूं.' म्हणून मी आलें आहें. उर्वशी कुठें आहे? मला गांठ घ्यावयाची आहे!'

नंतर राजानें उर्वशीस बोलावून आणल्यावर तापसीनें तिला म्हटलें, 'ही तुझी ठेव तुझ्या पतीसमक्ष मी तुझ्या स्वाधीन करतें. संभाळ बाई. यानें विद्या संपादन केली असून सांप्रत हा कवच धारण करण्यास समर्थ झालेला आहे. बरें येऊं तर आतां!' असें म्हणून ती जाऊं लागली. उर्वशीनें व राजानें तापसीला वंदन केल्यावर ती त्यांना आशीर्वाद देऊन निघून गेली.

पुत्रवती भार्येस पाहून राजास पराकाष्ठेचा आनंद झाला. तो तिला म्हणाला, 'इंद्राला ज्याप्रमाणें जयन्त त्याप्रमाणें मला हा आयु.'

हे शब्द कानीं पडतांच पूर्ववृत्ताचें स्मरण होऊन उर्वशी ढळढळां रडूं लागली. हें कां बरें? पुत्राची भेट फार दिवसांनीं झाल्यावर कोणती माता दुःखाश्रु ढाळील? उर्वशीवर तरी अशी कोणती आपत्ति कोसळली होती? 'सुंदरि, या वेळीं तूं कां रडतेस?' राजानें खेदानें व आतुरतेनें विचारलें. उर्वशीनें उत्तर दिलें, 'महाराज, इतउत्तर मी आपल्या सहवासास मुकणार; आपणांस पुत्रमुखदर्शन होईपर्यंतच मला येथें राहण्याची महेंद्राची परवानगी आहे.''

'हाय! हाय! दैव सदैव सुखाच्या आड कसें येतें पहा! त्याला

१ अहो सुखप्रत्यर्थिता दैवस्य।

कुणाचें बरें झालेलें पाहवत नाहीं', असें राजानें उद्गार काढले. व 'मला तरी आतां येथें राहून काय करावयाचें आहे? आयूला गादीवर बसवून हा आतांच मी वानप्रस्थाश्रम स्वीकारतों,' असें म्हणून लगेच त्यानें राज्याभिषेकाची सिद्धता करण्यास अमात्यास हुकूम सोडला. हें ऐकून सर्वांनाच अत्यंत विषाद वाटला.

इतक्यांत काय अद्भुत चमत्कार झाला पहा! त्रैलोक्यांत संचार करणारे नारदमुनि एकदम तेथें अवतीर्ण झाले. अर्घ्यादि उपचारांनीं राजानें त्यांचा सत्कार केल्यावर ते राजाला म्हणाले, 'आपण वनांत जाण्याचें मनांत आणलेलें त्रिकालज्ञ महेंद्रास तत्काल समजलें. त्यांनींच मला आपणांकडे धाडलें आहे. त्यांची आपणांस अशी आज्ञा आहे कीं, सुर आणि असुर यांचा लौकरच घनघोर संग्राम होणार आहे. तेव्हां आपल्या साहाय्याची गरज लागेल. तरी आपण सर्वसंगपरित्याग न करतां सुखानें राज्य करावें. उर्वशी आपली यावज्जीव सहधर्मचारिणी होऊन राहील.'

हें ऐकून राजास परमावधीचा आनंद झाला व तो म्हणाला, 'महेंद्राची आज्ञा मला शिरसावंद्य आहे. मी ही मोठी कृपाच समजतों.'

त्यावर नारदमुनींनें राजाचें अभिनंदन करून म्हटलें, 'हेंच सर्वथा योग्य होय. तुझें कार्य इंद्रानें करावें व इंद्राचें कार्य त्वां करावें; सूर्य अग्नीला तेज देतो व अग्नीहि सूर्याचें कार्य करतो. हा परस्पर उपकार उभयतांनाहि अत्यंत श्रेयस्कर व उचित आहे.'

नंतर नारदमुनीनें स्वहस्तानें आयूला यौवराज्याभिषेक करून 'इंद्रानें आपलें आणखी काय प्रिय करावें तें सांग?' असें राजास विचारलें. त्यावर राजा म्हणाला, 'परस्परविरोधी, म्हणजे एकाजागीं ज्यांचें वास्तव्य दुर्लभ असतें अशा, लक्ष्मी व सरस्वती एकत्र नांदोत, व सज्जनांचा उत्कर्ष व अभ्युदय होवो!'

१ परस्परविरोधिन्योरेकसंश्रयदुर्लभम्। संगतं श्रीसरस्वत्योर्भूतयेऽस्तु सदा सताम्॥

# शूद्रककृत मृच्छकटिक*

## पात्रें

| | |
|---|---|
| **चारुदत्त**–उज्जयिनीचा ब्राह्मण व्यापारी | **आर्यक**– एक गवळी |
| **धूता**–चारुदत्ताची पत्नी | **शर्विलक**–आर्यकाचा मित्र |
| **रोहसेन**–चारुदत्ताचा पुत्र | **वसंतसेना**-उज्जयिनीची एक रूपसंपन्न व उदार स्त्री |
| **मैत्रेय**–चारुदत्ताचा स्नेही | **मदनिका**–वसंतसेनेची दासी |
| **संस्थानक** अथवा **शकार**– पालक राजाचा मेहुणा | **रदनिका**–चारुदत्ताची दासी |

### भाग १ ला

आतां मी जी गोष्ट सांगणार आहे ती कोणा राजाची, राजकारणी पुरुषाची, शरवीराची अगर एखाद्या महाविभूतीची नसून एका सामान्य ब्राह्मण सावकाराची आहे. तथापि त्याच्या अंगीं कांहीं असामान्य गुण होते. परोपकारी, सदाचारी, उदार, पापभीरु व प्रामाणिक म्हणून त्याची सर्व उज्जयिनीनगरांत ख्याति पसरली होती. त्याचें नांव चारुदत्त. तो गर्भश्रीमंत होता, तरी त्यानें दानधर्मांत आपली संपत्ति खर्च केल्यामुळें त्यास दारिद्र्य प्राप्त झालें होतें; तें इतकें कीं, त्यास 'दारिद्र्यापेक्षां मरण बरें' असें वाटूं लागलें. तो म्हणे,

* मृद्+शकट = मातीचा गाडा. रोहसेनास मातीचा गाडा न आवडल्यानें वसंतसेनेनें त्यास सोन्याची गाडी करण्यास आपले दागिने दिले. ते परत नेऊन देत असतां न्यायसभेंत मैत्रेयभटजींच्या हातून ते खालीं पडले व चारुदत्ताच्या विरुद्ध तो पुरावा झाला. तेव्हां हा सर्व प्रकार मातीच्या गाड्यानेंच घडवून आणला, म्हणून शूद्रकानें या नाटकास 'मृच्छकटिक' असें नांव दिलेलें आहे.

१ दारिद्र्यान्मरणाद्वा मरणं मम रोचते न दारिद्र्यम् ।

'धनक्षय झाल्याचें मला दुःख वाटत नाहीं, पण लोक दरिद्री पुरुषाचा पदोपदीं अपमान करितात, याचेंच मला वाईट वाटतें; त्याची मित्रमंडळींत निंदा करतात; त्याचा विनाकारण द्वेष करतात; यामुळें त्यास आपले जीवित नको नकोसें होऊन जातें.

'[1]प्रथम दुःखें भोगून माणसास पुढ वैभव प्राप्त झालें म्हणजे काळ्याकुट्ट अंधारांत जसा दिवा शोभावा तसा तो शोभतो; पण एकदां सुखें भोगल्यावर मग मनुष्यास दरिद्रता आली तर लौकिकदृष्ट्या तो 'असुनि जिवंतहि मेला' याच कोटींत पडतो. त्यास कोणी विचारीत नाहीं; कमलांतील मध संपला म्हणजे जसे भुंगे त्यावरून उडून जातात, तद्वत् दारिद्र्य पावलेल्या पुरुषाचे संपत्कालचे मित्र त्यास सोडून जातात.

'मला स्वतःला संपत्ति गेल्याचें फारसें वाटत नाहीं; कारण संपत्तीचें काय मोठें? [2]ती दैवानुसार मिळते व जाते; पण माझ्या मनाला विशेष जें खातें तें हें कीं, मला दरिद्री समजून अतिथिजन मजकडे आतांशा येत नाहींत!'

एके दिवशीं सायंकाळीं चारुदत्ताच्या घराच्या मागच्या रस्त्यानें एक स्त्री चालली होती. तिच्या अंगावर सोन्यामोत्यांचे भारी किमतीचे दागदागिने होते. तिजबरोर एक दोन दासीहि होत्या, तथापि बराच काळोख पडल्यामुळें तिची व दासींची चुकामूक झाली. ही संधि साधून संस्थानक नामक कोणी एक राजाच्या मर्जींतला पुरुष मनांत पापवासना धरून तिचा पाठलाग करूं लागला. तो पडला राजश्यालक म्हणजे राजाचा मेहुणा; तेव्हां त्यास वाटे कीं, आपण करूं ती पूर्वदिशा! त्याच्याबरोबर त्याचे दोन सेवक होते.

'वसंतसेने थांब, वसंतसेने थांब,' अशा तो तिला मोठमोठ्यानें

---

१ सुखं हि दुःखान्यनुभूय शोभते । घनांधकारेष्विव दीपदर्शनम् ।

२ भाग्यक्रमेण हि धनानि भवन्ति यान्ति ।

हाका मारूं लागला. वसंतसेना घाबरून जाऊन, झपाझपां पाउलें टाकीत चालूं लागली. संस्थानक जितका लबाड तितकाच बेअकली व पक्का मूर्ख होता. तो मोठ्यानें ओरडला कीं, 'हे वसंतसेने, तुझ्या वेणींतील फुलांचा घमघमाट माझ्या कर्णरंध्रांत शिरतो, पण तुझ्या अंगाखांद्यावरील दागिन्यांचा मंजुळ ध्वनि अद्याप दृष्टिगोचर होत नाहीं. या अंधकारानें तर माझी कानठळी बसली!'

मग तो आपल्या सेवकास उद्देशून म्हणाला, 'अरे विटा, संभाळ रे संभाळ! जवळच चारुदत्ताचें घर आहे; आपल्या हातांतून निसटून वसंतसेना कदाचित् त्या घरांत शिरेल.'

हें ऐकून वसंतसेना मनांत म्हणाली, 'वाहवा! फार चांगलें झालें! ह्या दुष्ट चांडाळानें अपकाराच्या मिषानें माझ्यावर उपकारच केला म्हणावयाचा! मला कुठें तरी आतां आश्रयाला गेलेंच पाहिजे.'

चारुदत्ताला जरी गरिबी आली होती, तरी तो मोठा उदार, रसिक व सच्छील असल्याची कीर्ति वसंतसेनेच्याहि कानावर गेली होती, व तिनें त्यास एकदां पाहिलेंहि होतें. म्हणून तिनें त्याच्याच घरांत आश्रयार्थ जावयाचें ठरविलें. हातानें भिंत चांचपतां चांचपतां मागील परसाचें दार तिच्या हातास लागलें. तें बंद होतें. पण तिच्या नशिबानें तें तत्क्षणीं उघडलें!

याच सुमारास चारुदत्तानें सायंकाळची देवतांची पूजाअर्चा करून त्यांना अर्पण करण्याकरितां बली तयार केला होता व आपल्या मैत्रयभट नावाच्या एकनिष्ठ मित्रास तो चव्हाट्यावर नेऊन ठेवण्यास सांगितलें होतें. त्यानें मागील अंगणाचें दार उघडावयाला व वसंतसेना तेथें यावयाला एकच गांठ पडली. मैत्रेयाच्या हातांतला दिवा आपल्या पदरानें मालवून त्यास नकळत ती घरांत शिरली, व चारुदत्त जप करीत बसला होता तेथें जाऊन ती त्याच्या पाठीमागें एका बाजूस उभी राहिली.

वसंतसेना चारुदत्ताच्या घरांत शिरली असावी अशी शंका येतांच शकार व त्याचे सेवक निराश होऊन रस्त्यावरून चालते झाले.

कांहीं वेळानें चारुदत्ताचें वसंतसेनेकडे लक्ष गेलें, तेव्हां ती हात जोडून त्यास म्हणाली, 'महाराज, मी आपल्या अनुज्ञेवांचून येथें आलें, याची क्षमा असावी. हे माझे अलंकार आपल्या घरीं असूं द्या, कारण यांच्या लोभानें दुष्टांनीं माझी पाठ पुरवली आहे. कृपा करून मला घरीं पोंचविण्याची तजवीज करावी.' चारुदत्त म्हणाला, 'ठेव ठेवण्यास हें घर प्रस्तुत अयोग्य आहे. तुझी इच्छाच असल्यास ठेव." यावर वसंतसेनेनें उत्तर दिलें, "ठेवे माणूस पाहून ठेवतात, घर पाहून नाहीं."

इतक्यांत मागील परसदार बंद करून मैत्रेयभटजी तेथें आले. त्यांच्याजवळ ते अलंकार देऊन चारुदत्तानें त्यांस बजविलें कीं 'मित्रा, ह्या बाईचे हे दागिने संभाळून ठेव.' मैत्रेयभटजींस वाटलें कीं, बाईनें हा आपणांस दानधर्मच केला आहे. भिक्षुकच ते! म्हणून त्यांनीं वसंतसेनेकडे वळून हर्षानें म्हटलें, 'बाई, ईश्वर तुझें कल्याण करो.'....

'हा मूर्खा,' चारुदत्तानें सस्मित मुद्रेनें मध्येंच त्यास म्हटलें 'ही तिची ठेव आहे; थोड्याच दिवसांनीं ही परत द्यावयाची आहे.'

तें ऐकून मैत्रेयभटजी स्वतःशींच म्हणाले, 'अस्सं! मग चोर कां ती नइना!'

नंतर चारुदत्त व त्याचा मित्र यांनीं वसंतसेनेस तिच्या घरापर्यंत नेऊन पोचविलें, व ते आपल्या घरीं परत आले.

रात्रौ मैत्रेयभटजी दागिन्यांचें गांठोडें जवळ घेऊन निजला असतां, 'बोलाफुलास एकच गांठ' पडून चारुदत्ताचें घर फोडून एक चोर आंत शिरला. त्याच वेळीं 'अरे मित्रा, चोर आंत आला आहे, भिंतीला भोंक पाडल्यासारखें दिसतें; तर हे दागिने तूं आपल्याजवळ

१ पुरुषेषु न्यासा निक्षिप्यन्ते न पुनर्गेहेषु ।

ठेव.' अशा प्रकारें मैत्रेय झोपेंत बरळूं लागला. त्याच्या उशाशीं समई जळत होती.

या भिकारड्या घरांत आपणांस कांहीं लभ्यांश नाहीं असें समजून चोर निघून जाण्याच्या विचारांत होता, तोंच त्याच्या कानीं वरील शब्द पडले. तेव्हां पुढें होण्यास ही वेळ चांगली आहे असें पाहून तो मैत्रेयाजवळ आला व त्याच्या हातांतली गांठोडें घ्यावयास त्यानें आपला हात पुढें केला.

मैत्रेय पुनः अर्धवट झोपेंत म्हणतो—'मित्रा चारुदत्ता, तुला गाईब्राह्मणांची शपथ आहे, घे लौकर हें म्हणजे मी सुटलों.'

शर्विलकाच्या—त्या चोराच्या—हाताचा स्पर्श होतांच मैत्रेय स्वप्नांतच म्हणतो—'अरे चारुदत्ता, तुझ्या हाताचीं बोटें गार कां लागतात!' चोर मनांत चपापला. भिंत फोडतांना तीवर पाणी शिंपडल्याने त्याचीं बोटें थंडगार झालीं होतीं, म्हणून त्यानें काखेंत हात घालून बोटांना ऊब आणली. आणि मैत्रेयानें हातानें पुढें केलेलें गांठोडें हलकेंच घेऊन त्यानें तेथून सूं केलें.

मैत्रेयास वाटलें, आपण चारुदत्ताच्याच हातीं दागिने देत आहोंत; म्हणून तो तसाच झोपेंत चावळतां चावळतां 'मित्रा, आतां मी निश्चित झालों. आतां मला सुखानें झोंप येईल.' असें डोळे मिटूनच पुटपुटत या कुशीचा त्या कुशीवर झाला, आणि पुनः घोरूं लागला.

सकाळच्या प्रहरीं चारुदत्ताच्या दासीला घराच्या भिंतीस एका माणसास सहज आंत येण्याजोगें भोंक पाडलेलें दिसलें. अर्थातच तिनें मैत्रेयभटजीस लागलींच जागें करून रात्रीं चोर शिरल्याची बातमी सांगितली. तेव्हां डोळे चोळीत चोळीत उठतांना मैत्रेय म्हणतो, 'आमच्या घरांत चोर कशाला येतो? त्याला काय वेड लागलें आहे?'

भटजीबोवांचे डोळे अर्धवट झोपेनें चुरचुरत होते, पण भिंतीला भलें मोठें भगदाड पडलेलें दृष्टीस पडतांच ते लख्ख उघडले. लगेच

त्यानें चारुदत्तास जागें करून घरांत चोरी झाल्याचें त्यास सांगितलें. प्रथम त्यास वाटलें कीं, मैत्रेय आपली थट्टा करीत आहे. पण उंशा-कडच्या भिंतीचा भोकसा पाहिल्यावर तो एकदम उद्गारला, 'हा भोकसा तरी किती डौलदार पाडला आहे. वाहवा रे कौशल्य ! बेट्याचें दैव खोटें ! त्या बिचाऱ्या चोरास येथून विन्मुख जावें लागलें असेल.'

'आँ !' मैत्रेय स्मरण झाल्यासारखी मुद्रा करून म्हणाला, 'मित्रा, तूं नेहमीं म्हणत असतोस ना कीं, मैत्रेय मूर्ख, मैत्रेय वेडा; पण आज तर आम्हीं शहाणपणाची गोष्ट केली कीं नाहीं? '

"ती कोणती बुवा ? " चारुदत्तानें विचारलें.

'तरी बरें ! तें दागिन्याचें गांठोडें मीं तुझ्या स्वाधीन केलें. नाहीं तर त्या चोरानें लांबविलें असतें !"

'केव्हां बरें ? मजपाशीं गांठोडें दिलें म्हणतोस तें केव्हां ?"

'मीं नाहीं का तुला विचारलें, तुझ्या हाताचीं बोटें गार कां लागतात म्हणून ? तेव्हांच गांठोडें दिलें.'

'असें काय ? तर मग उपटले ते दागिने चोरानें ! पण ती होती दुसऱ्याची ठेव !! '

'मग ती तिसऱ्यानें नेली असें वसंतसेनेस सांग म्हणजे झालें. त्यास आम्हीं काय करावें ?'

'छे, छे ! हें काय म्हणतोस ? माझ्या कीर्तीला कलंक लागेल असें मी कधींहि करणार नाहीं. तें ऋण फेडण्यासाठीं जरूर पड-ल्यास मी दारोदार भिक्षाहि मागेन.'

'जशी गोष्ट घडली तशी जर त्या बाईला सांगितली तर तिला ती खरी वाटणार नाहीं. तेव्हां वसंतसेनेस कांहीं कळूं न देतां तिच्या दागिन्यांची भरपाई कशी होणार ?' अशी चारुदत्तास चिंता

पडली. हे वर्तमान चारुदत्ताची पत्नी धूताईस समजतांच तिनें आपल्या माहेराहून आणलेल्या दागिन्यांपैकीं एक रत्नांची माळ काढली व मैत्रेयास एकीकडे बोलावून म्हटलें, 'ही माळ त्यांच्याजवळ नेऊन दे आणि सांग कीं, ही त्या दागिन्यांच्या मोबदला पाठवावी.'

त्याप्रमाणें मैत्रेयानें सांगितलें तेव्हां चारुदत्तास प्रथम फार वाईट वाटलें. इतकें दारिद्र्य आलें तरी तो पत्नीच्या स्त्रीधनास शिवला नव्हता. परंतु आपल्या सहधर्मचारिणीनें योग्य काळीं आपणांस साहाय्य केलें याबद्दल कौतुक वाटून तो आपणांस धन्यहि मानूं लागला आणि लागलींच त्यानें मैत्रेयास सांगितलें कीं, 'वसंतसेनेकडे जाऊन ही माळ तिला दे व असें सांग कीं, तुझे दागिने चारुदत्त द्यूतांत हरला, म्हणून त्यांच्या मोबदला या रत्नमालेचा स्वीकार कर.'

'हें काय भलतेंच !' मैत्रेय विस्मित मुद्रेनें उद्गारला. 'तिचे अलंकार ते किती मोलाचे व ही रत्नमाला कोणीकडे ! त्यांच्या कितीतरी पट अधिक किंमतीची ही माळ तूं त्या दागिन्यांच्या मोबदला कशी देतोस ?'

'अरे, तिनें माझ्यावर जो विश्वास ठेवला त्याची किंमत म्हणून मी ही माळ देत आहें, दागिन्यांची किंमत म्हणून नव्हे.'

'बरें बुवा, तूं सांगतोस म्हणून मी जातों.'

'जाच, आणि तिच्याशीं बोलतांना आपलें दैन्य मात्र दाखवूं नकोस.'

रत्नमाला घेऊन मैत्रेय वसंतसेनेकडे जाण्यास निघाला. इकडे शर्विलक हा चोर चारुदत्ताच्या घरचे दागिने घेऊन जो पळाला तो सकाळीं वसंतसेनेच्या घरीं गेला. वसंतसेनेची दासी मदनिका म्हणून होती तिच्यावर त्याचें प्रेम बसलें होतें. तिला दास्यमुक्त करण्यास लागणारें द्रव्य त्याच्याजवळ नसल्यानें चोरी करून द्रव्य मिळ-

बावें आणि ते वसंतसेनेस देऊन मदनिकेस सोडवावें असा निर्धार करून त्यानें चोरीच्या मार्गाचा अवलंब केला होता. वसंतसेनेच्या घरीं मदनिकेची भेट घेऊन त्यानें ते दागिने तिला दाखविले. हे दागिने आपल्या यजमानणीचे असें मदनिकेनें तेव्हांच ओळखलें आणि ती एकदम त्यास म्हणाली, 'हे दागिने आपल्या हातीं कसे आले?'

त्यानें उत्तर दिलें, 'साहस[1] केल्यानेंच संपत्ति मिळते.' मग कोठें साहस केलें, कसें केलें, वगैरे गोष्टी निघून 'चारुदत्ताच्या घरचे हे दागिने' असे गुपित म्हणून शर्विलकानें मदनिकेस सांगितलें; व आपणांस या निंद्य कर्माचा पश्चात्ताप होत आहे अशीहि त्यानें कबुली दिली.

चारुदत्ताचें नांव उच्चारलेलें ऐकतांच मदनिका चपापली व तिनें शर्विलकास एक उत्कृष्ट उपाय म्हणून सुचविला. तो असाः—

'शर्विलका, तूं वसंतसेनेस भेट आणि तिला असें सांग कीं, हे दागिने आपणांकडे पोंचविण्याला चारुदत्तानें मजजवळ दिले आहेत; असें केलंस म्हणजे बाईसाहेबांचे दागिने त्यांचे त्यांना मिळतील, चारुदत्त ऋणमुक्त होईल व तुला चोरीचें पाप लागणार नाहीं.'

तेव्हां शर्विलकानें वसंतसेनेकडे जाऊन ठरल्याप्रमाणें कामगिरी बजाविली. वस्तुतः शर्विलकाचें व मदनिकेचें संभाषण वसंतसेनेनें आडून उत्सुकतेनें ऐकलें होतें; व हे दागिने शर्विलकानें कसे, कोठून आणले वगैरे खरा प्रकार तिच्या ध्यानीं येऊन चुकला होता. तेव्हां समोर येऊन 'मला चारुदत्तानें सांगितलें आहे कीं, जो दागिने आणील त्याला मदनिका द्यावी; तर ही घ्या मदनिका.' असें म्हणून तिनें मदनिकेची दास्यांतून मुक्तता केली व तिला तिनें सालंकृत करून शर्विलकास अर्पण केलें. हें पाहून शर्विलक म्हणाला, 'मला हें कांहीं समजलें नाहीं.' वसंतसेना म्हणाली, 'पण मला समजलें.'

---

१ साहसे श्रीः प्रतिवसति ।

याप्रमाणें तिनें दोघांस संतुष्ट करून त्यांची पाठवणी केल्यानंतर मैत्रेय भटजींचीं स्वारी तेथें येऊन थडकली. वसंतसेनेचें वैभव व श्रीमंती थाट पाहून त्याचे डोळे दिपून गेले. मग आसनावर बसल्यावर ते तिला म्हणाले, 'श्रेष्ठ चारुदत्ताजवळ तूं जे सुवर्णालंकार विश्वासानें ठेविले होतेस, ते त्यानें स्वतःचेच समजून द्यूतांत गमाविले; म्हणून त्यांच्या मोबदला ही भारी किंमतीची रत्नमाला तूं घे.'

हें ऐकून वसंतसेना मनांत म्हणाली, 'काय! चोरानें नेले असून द्यूतांत गमाविले म्हणतो! चारुदत्ता, या तुझ्या गुणांवरून पंचप्राण ओंवाळून टाकावे असें मला वाटतें.'

तिनें ती माळ ठेवून घेतली. तें पाहून मैत्रेयभटजींस फार आश्चर्य वाटलें. वसंतसेना ही खूप श्रीमंत असल्यानें आपल्या अल्प किंमतीच्या दागिन्याकरितां इतकी मोठ्या किंमतीची माळ ती ठेवून घेईल असें त्यास वाटलें नव्हतें. माळ ठेवून घेतल्यानंतर 'आज सायंकाळीं मी आपल्या भेटीस येणार आहें,' असा चारुदत्तास निरोप कळविण्यास सांगून तिनें मैत्रेयभटजींस जाण्यास सांगितलें.

संध्याकाळीं चारुदत्त आपल्या बागेंत मैत्रेयाशीं गप्पागोष्टी करीत बसला असतां वसंतसेना तेथें त्यास भेटण्यास आली. वाटेंत तिला पावसानें गांठल्यामुळें ती नखशिखान्त चिंब भिजून गेली होती. तेथें येतांच चारुदत्ताच्या अंगावर फुलें उधळून तिनें स्मितपूर्वक म्हटलें, 'काय द्यूतकार, हा प्रदोषसमय तुम्हांस सुखावह आहेना?' चारुदत्तानें तिचें अत्यानंदानें स्वागत करून तिला कोरडीं वस्त्रें आणून देण्यास मैत्रेयास सांगितलें.

वसंतसेनेनें येतांना आपणांबरोबर चारुदत्ताची रत्नमाला आणली होती ती चारुदत्ताच्या पत्नीस नेऊन देण्यास तिनें आपल्या दासीस सांगितलें व चारुदत्ताकडे पाहून म्हटलें, 'ही माला या आपल्या दासीस शोभत नाहीं.'

इतक्यांत चारुदत्ताचा लहान मुलगा रोहसेन तेथें रडत रडत धांवत आला.

'बाळा, तूं कां रडतोस? तुला काय पाहिजे?' असें वसंतसेनेनें त्यास विचारलें. त्यावर त्या मुलाची दाई रदनिका मध्येंच म्हणाली, 'हा साऱ्या मुलखाचा हट्टी आहे. किती तरी बाई याचे लाड पुरवायचे! शेजारच्या मुलाचा सोन्याचा गाडा पाहून यानें त्यासाठींच हट्ट धरला आहे. मी याला चांगली सुरेख मातीची गाडी करून दिली, पण ज्याचें नांव तें.' तो म्हणतो, 'मला नको जा तसली मातीची गाडी!' 'काय बाई करावें?'

वसंतसेना लडिवाळपणानें म्हणाली, 'ये, बाळा ये, मला पापा दे पाहूं. हे घे माझे दागिने, तुला हवी तशी गाडी करवून आण बरें.'

थोड्या वेळानें विजेचा कडकडाट होऊं लागला! आकाश काळ्याकुट्ट मेघांनीं व्यापून टाकिलें, तेव्हां 'पुनः येईन' असें सांगून वसंतसेना गाडींत बसून आपल्या घरीं निघून गेली.

---

## भाग २ रा

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चारुदत्त पुष्पकरंडक नामक उद्यानांत जावयास निघाला. वसंतसेनेनें अभिवचन दिलें असल्यानें तिला तिकडे आणण्यास त्यानें गाडी पाठविली.

इकडे वसंतसेना उत्सुकतेनें मार्गाकडे दृष्टि लावून बसली असतां तिच्या दारापाशीं एक गाडी येऊन थडकली व वसंतसेना तींत जाऊन बसली देखील! पण ती चारुदत्तानें पाठविलेली गाडी नव्हती हें खास!

मग ती कोणाची बरें असावी? घाईंत असलेला धांदल्या प्रवासी ज्याप्रमाणें रेल्वे जंक्शनवर भलत्याच आगगाडींत जाऊन बसतो, त्याप्रमाणें वसंतसेना त्या गाडींत चुकून जाऊन बसली. हा अतिशय औत्सुक्याचा परिणाम! तिनें चौकशी देखील कशी केली नाहीं? काय झालें न कळे! गाडीवानाच्याहि ही चूक लक्षांत आली नाहीं.

ज्या बागेंत चारुदत्त फिरावयास गेला होता, त्याच बागेंत शकारहि फिरावयास गेला होता; व त्याच्या आज्ञेनुसार त्याचा एक सेवक त्याला परत घरीं नेण्यासाठीं गाडी घेऊन येत होता. वसंतसेनेच्या घराजवळील रस्त्यावर बरीच गर्दी असल्यामुळें त्यानें तिच्या दारासमोर गाडी अम्मळ उभी केली होती. गाडीला चारी बाजूंनें शोभिवंत पडदे लाविले होते. आपल्याकरितांच चारुदत्ताकडून ही गाडी आलेली आहे असें समजून वसंतसेना केव्हां आंत जाऊन बसली हें त्या गाडीवानास मुळींच समजलें नाहीं. इतर गाड्यांच्या खडखड आवाजामध्येंहि असें होणें स्वाभाविक होतें.

कसेंहि असो. गाडी चालू झाली. प्रमुदित अंतःकरणानें वसंतसेना चारुदत्तास भेटण्यास निघाली. त्या बागेंत केव्हां एकदां जाऊन पोहोंचेन असें तिला झालें होतें. अरेरे! बिचारीला काय ठाऊक कीं, दैवाची योजना निराळीच होती! सुग्रास पंचपक्वान्नाऐवजीं तिच्यापुढें दैवानें विषमिश्र अन्नाचें ताट वाढून ठेवलें होतें!

उज्जयिनीनगरीच्या राजाचें नांव पालक असें होतें. नांव मात्र 'पालक,' पण तो प्रजेचें पालन मात्र दक्षतेनें करीत नसे. त्यास 'पीडक' म्हटलें असतें तर तें अधिक शोभलें असतें! त्याच्या जुलमाला कंटाळून कांहीं लोकांनीं कट केला. आर्यक हा कटवाल्यांचा पुढारी होता. त्याच वेळीं एका ज्योतिष्यानें असें भविष्य वर्तविलें होतें कीं, आर्यक नांवाचा एक गवळ्याचा पुत्र राजा होणार. या भीतीनें पालक राजानें आर्यकास बंदींत टाकिलें होतें.

शर्विलक हा आर्यकाचा जीवश्च कंठश्च मित्र होता. त्यास हें दुःखप्रद वृत्त समजतांच त्यानें आपल्या मित्रास कारागृहांतून बंधमुक्त करण्यासाठीं आटोकाट खटपट चालविली. सुदैवानें त्यास तींत यश येऊन आर्यक तुरुंगांतून निसटला व धूम ठोकीत चालला असतां रस्त्यांतील एका गाडींत जाऊन बसला. चारुदत्तानें वसंतसेनेसाठीं पाठविलेली गाडी ती हीच. त्या गाडीस अर्थात् पडदे होतेच. पाठीमागून गाडींत बसतांना आर्यकाच्या हातापायांतील शृंखलांचा नाद झाला तेव्हां गाडीवानास असें वाटलें कीं, वसंतसेनेच्या पायांतील पैंजणांचा हा ध्वनि आहे !

अशा तऱ्हेनें ही गाड्यांची अदलाबदल झाली. तिचा कितीतरी घोर परिणाम पुढें होणार आहे !!

इकडे पुष्पकरंडकांत चारुदत्त उत्कंठेनें वसंतसेनेची मार्गप्रतीक्षा करीत बसला होता. कांहीं वेळानें तेथें एक गाडी येऊन थडकली. पण काय ! तींत वसंतसेना नसून आर्यक होता. गाडी उभी राहतांच त्यानें खालीं उडी मारिली. हातकड्या असलेल्या स्थितींत त्यास पाहातांच चारुदत्ताचें हृदय कळवळलें. आणि स्वतःची निराशा पार विसरून जाऊन त्यानें आपल्या सेवकास आर्यकाच्या बेड्या तोडण्यास सांगितलें व मग त्याच गाडींत बसून नगराच्या हद्दीबाहेर निसटण्यास त्यास सुचविलें; कारण राजसेवक त्याचा सारखा तपास करीत सर्वत्र संचार करीत होते.

आतां वसंतसेना येण्याची वेळ टळली, असें समजून खिन्न व जड अंतःकरणानें चारुदत्तानें घरचा मार्ग सुधारला. वाटेंत त्यास बरेच अपशकुन झाले; तेव्हां त्याचें हृदय धडधडूं लागलें.

तिकडे वसंतसेना ज्या गाडींतून पुष्पकरंडक उद्यानांत चालली होती त्या गाडीवानाचे 'झ्यां. 'झ्यां.' 'बाळया. बाळया.' असे बैल हाकतांना

काढलेले उद्गार ऐकून वसंतसेना स्वतःशीं पुटपुटली, अगबाई, हा कांहीं चारुदत्ताच्या गाडीवानाचा शब्द नव्हे !

तिचें हृदय कंप पावूं लागलें. उजवा डोळा लवूं लागून दुश्चिन्हें होऊं लागलीं. कांहींतरी विपरीत घडणार असें तिचें मन तिला ग्वाही देऊं लागले.

शकार ज्या शिलातलावर बसला होता त्या ठिकाणीं ती गाडी येऊन ठेपतांच वसंतसेनेस पाहून त्यास वाटलें कीं, ही आपणांसच भेटावयास आली आहे. म्हणून तो तिला म्हणतो, 'देवि, तुझ्या पायांवर मस्तक ठेवून तुला विनंती करतों कीं, मीं पूर्वीं केलेल्या अपराधाची क्षमा करून मला आपल्या पायांचा दास कर'.

शकार दृष्टीस पडतांच आतां हा आपला प्राण घेतो कीं काय, अशी वसंतसेनेस भीति वाटूं लागली; पण जरा धीर धरून रागानें ती म्हणाली, 'चल दूर हो, दुष्टा, काय बोलतोस हें ?' आणि असें बोलून तिनें त्यास पायानें दूर लोटून दिलें.

वसंतसेनेनें त्याचा पूर्वीं अपमान केला असल्यामुळें शकाराचा कोपाग्नि धुमसत होताच, तो या लाथेनें प्रज्वलित झाला. त्यामुळें वसंतसेनेस ठार मारण्याचें विचार त्याच्या मनांत येऊं लागले.

मग त्यानें आपल्या गाडीवानास दूर जावयास सांगितलें व जवळपास कोणी नाहीं असें पाहून त्यानें वसंतसेनेचा गळा दाबला व म्हटलें, 'येऊं दे तो तुझा भिकारडा चारुदत्त तुझें रक्षण करायला.'

'आर्या चारुदत्ता, हा मी तुला शेवटचा प्रणाम करितें,' असा आक्रोश करीत ती अबला जमिनीवर पडून निश्चेष्ट झाली.

शकारास वाटलें कीं ही आतां मृत झाली; म्हणून त्यानें तिचा देह वाळलेल्या पानांनीं झांकून तेथून लगेच पाय काढला.

वाटेंत त्याला एक युक्ति सुचली. त्यामुळें कृष्णकृत्यानें काळवंडलेला त्याचा चेहरा किंचित् प्रफुल्लित झाला. 'हां' तो मनाशीं म्हणतो,

'दरिद्री चारुदत्तानें धनलोभास्तव वसंतसेनेस पुष्पकरंडक उद्यानांत ठार मारलें अशी न्यायमंदिरांत फिर्याद करितों म्हणजे झालें.' असा विचार करीत करीत तो उद्यानाच्या बाहेर पडतो न पडतो तोंच एक संन्याशी स्नान करून त्या बागेंत शिरला व छाटी वाळत टाकण्यास चांगलेसें ठिकाण शोधूं लागला. झाडावर वानरांचा उपद्रव होईल असें वाटून त्यानें वाळलेल्या पानांच्या ढिगावर आपली छाटी वाळत टाकली. व जवळच एका शिळेवर बसून तो स्तोत्रपाठ म्हणूं लागला. इतक्यांत एकाएकीं असा चमत्कार झाला कीं, त्या पानांच्या राशींतून एक हात बाहेर येतांना त्याला दिसला व दीर्घ सुस्काराहि त्याच्या कानीं पडला.

'ओहो, काय आश्चर्य हें! सुवर्णालंकारांनीं विभूषित असा हा हात कोणाचा असावा बरें?' असें मनांत म्हणत त्यानें हलक्या हातानें सगळीं पानें बाजूस सारलीं.' तेव्हां 'अरे! ही वसंतसेना! ही येथें कशी आली? हिची अशी दशा कशानें बरं झाली?' असे खेदोद्गार त्याच्या मुखावाटे बाहेर पडले. परंतु या दुःखाच्या अगर विस्मयाच्या अधीन फार वेळ न होतां त्यानें वसंतसेनेच्या कपाळावर छाटीचें पाणी शिंपडून वारा घातला व त्यामुळें ती शुद्धीवर आली; व उठून बसतां बसतां खोल आवाजानें म्हणाली 'आर्या, तूं मला जीवदान दिलेंस असें मी समजतें.' यावर संन्याश्यानें उत्तर दिलें, 'काय! आपण मला ओळखलें नाहीं वाटतें? जुगारापायीं मी द्यूतकाराच्या तावडींत सांपडलों असतां दहा मोहरा देऊन त्या दुष्टापासून आपणच माझे प्राण वांचविलेत! माझ्या वृत्तींत पालट होण्यास आपणच कारणीभूत झालांत.'

वसंतसेना म्हणाली, होय, मी तुम्हांस चांगलें ओळखलें. पण मोहरा दिल्याचें जें तुम्ही म्हणतां तें मात्र मला स्मरत नाहीं.

पुढें संन्याश्यानें तिला आणखी कांहीं प्रश्न केले नाहींत; कारण ती क्षीण झाली असल्यानें तिच्यानें बोलवत नाहीं, असें त्याच्या ध्यानीं

येऊन चुकलें. आणि लागलींच त्यानें बागेलगतच्या एका मठांत आपल्या धर्मभगिनीकडे तिला पोंचतें केलें.

इकडे दुसऱ्या दिवशीं शकारानें न्यायसभेंत चारुदत्ताविरुद्ध फिर्याद दाखल केली. न्यायाधीश सभागृहांत येऊन स्वस्थानापन्न झाले. शकाराची स्वारी झोकदार पोशाख करून मोठ्या डौलानें चालत जाऊन थेट न्यायाधिशास चिकटून बसली. हा त्याचा उद्धटपणा पाहून न्यायाधिशानें त्याला योग्य स्थानीं जाऊन बसण्यास सांगितलें. त्यावर तो म्हणतो, आं, मला उठायला लावितां? मला तुम्ही कोण समजलांत? मी राजाचा मेहुणा आहें. ही सर्व भूमि माझी आहे, वाटेल तेथें मीं जाऊन बसेन.

**न्यायाधीश**— आपण फिर्यादी आहां काय?

**शकार**— यांत काय संशय?

**न्या०**— काय फिर्याद आहे?

**श०**— मी तुमच्या कानांत सांगेन. मी अगडबंब कुळांत जन्मलों आहे. माझा बाप राजाचा सासरा. राजा माझ्या बापाचा जांवई! म्हणजे माझ्या बहिणीचा नवरा; समजलां?

**न्या०**— हें खरें, पण येथें कुलाचा संबंध नाहीं, शीलाचा आहे. तुमची फिर्याद काय ती लवकर बोला.

**श०**— मी म्हणतों, मीं जरी अपराध केला तरी माझें कोण काय बांकडें करणार आहे! मी पुष्पकरंडक उद्यानांत वसंतसेनेचें प्रेत पाहिलें. तिला कोणा पुरुषानें द्रव्यलोभासाठीं बाहुपाशांनीं मुद्दाम मारिलें. मीं नाहीं हो!

**न्या०**—( लेखकास उद्देशून ) कायस्थ, हाच खटल्याचा मुख्य मुद्दा लिहून ठेवा. ( शकाराकडे वळून ) 'धनलोभास्तवच मारिली' असें आपण कशावरून म्हणतां?

श॰— अलंकार घालण्याचीं सर्व स्थानें रिकामीं होतीं.

मग न्यायाधिशानें वसंतसेनेच्या आईस बोलावणें पाठविलें, तेव्हां शकार मध्येंच म्हणतो, वसंतसेनेची आई कशास पाहिजे येथें?

न्या॰— अहो हें न्यायाचें काम आहे. आम्हांस पुराव्यावांचून कोणतीहि गोष्ट करितां येत नाहीं.

वसंतसेनेची वृद्ध आई न्यायमंदिरांत आल्यावर न्यायाधीश तिला म्हणाले, बाई, या वेळीं तुमची मुलगी कोठें आहे?

बाईनें तत्काळ उत्तर दिलें, 'ती चारुदत्ताकडे गेली आहे.'

तेव्हां शकार मध्येंच उठून ओरडून म्हणाला, माझी आतां चारु-दत्तावर फिर्याद आहे.

आतां श्रेष्ठ चारुदत्तास आणल्यावांचून गत्यंतर नाहीं, असा विचार करून न्यायाधिशानें 'आपल्या दर्शनाची फार इच्छा आहे' असें सांगून चारुदत्तास सत्कारपूर्वक आणण्यास सेवकास आज्ञा केली.

चारुदत्त येतांना लांबून पाहतांच न्यायाधीश उद्गारले, याचे विशाल व पाणीदार नेत्र, उंच कपाळ व याची एकंदर मुखचर्या, यांवरून याच्या ठिकाणीं अपराध संभवत नाही.[१]

न्या॰—आर्य चारुदत्ता, तुझें स्वागत असो. (असें म्हणून त्यास त्यांनीं उच्चस्थानीं बसविलें.)

श॰— काय! स्त्रीघातक्याला आसन बसावयास देतात!! वाहवा रे न्याय!!!

न्या॰— आर्या चारुदत्ता, ह्या म्हातारीच्या मुलीशीं तुझी मैत्री आहे काय?

चा॰ — होय.

न्या॰— ती आतां कोठें आहे?

---

१ न ह्याकृतिः सुसदृशं विजहाति वृत्तम् ।

चा०— ती घरी गेली इतकेंच मला माहीत आहे; याहून अधिक मला कांहींच ठाऊक नाहीं.

श०—अरे, वसंतसेनेस मारूनसवरून आतां ती घरीं गेली असें म्हणतोस काय?

चा०— अरे, तुझ्या चर्येकडे पाहून मला तुझाच संशय येतो. नीच कर्म करणाऱ्याप्रमाणें तुझे ओंठ काळे दिसतात!

श०— मी जांभळें खाल्लीं होतीं.

न्या०— (शकारास) चारुदत्तावर आरोप करतांना तुझी जिव्हा कशी झडली नाहीं?

म्हातारी—(शकारास) अरे चांडाळा, ज्यानें त्याच्याजवळ ठेव ठेवलेले दागिने चोरानें नेले असतां त्यांच्या मोबदला पृथ्वीच्या मोलाची रत्नमाला दिली, तो द्रव्याच्या लोभानें असें पापकर्म करील काय?

इतक्यांत न्यायाधिशानें पुष्पकरंडक उद्यानांत पाठविलेला दूत परत येऊन सांगूं लागला कीं, तेथें एका स्त्रीचे हातपाय व केस तुटून पडले आहेत, व इतर बराचसा भाग कोल्ह्याकुत्र्यांनी खाऊन टाकला असल्यामुळें हें अमकीचें प्रेत असा तर्क करितां येत नाहीं.

चा०— शिव शिव! हा दुर्दैवा! काय ही दशा!

न्या०—आर्या, हा शकार म्हणतो त्याप्रमाणें ही गोष्ट तुझ्या हातून घडली काय?

चा०—अहो, या दुष्टाच्या बोलण्यावर अगदीं विश्वास ठेऊं नका.

अशा प्रकारें न्यायसभेचें काम चालू असतां चारुदत्ताचा मित्र मैत्रेय तेथें आला. रोहसेनाला गाडी करण्याकरितां वसंतसेनेनें जे अलंकार दिले होते ते चारुदत्ताच्या आज्ञेनुसार तिचे तिला परत नेऊन देण्याकरितां तो (मैत्रेय) चालला होता. वाटेंत त्याला चारुदत्त न्यायसभेंत गेल्याचें वर्तमान कळल्यावरून तो दागिन्यांचें गांठोडें काखोटीस मारून तसाच तिकडे आला.

मग चारुदत्तानें आपल्या मित्रास खटल्याचें एकंदर स्वरूप कानांत सांगितल्यावर तो तारस्वरानें व आवेशानें म्हणाला—अहो अधिकाऱ्यांनो, ज्यानें केवळ परोपकारार्थ बागा, देवालयें, धर्मशाळा इत्यादि बांधून आपल्या नगरास शोभा आणिली, तो हल्लीं गरीब झाला म्हणून असें निंद्य कर्म करील काय? अरे नीचा शकारा, अशा दयाळू आणि उदार पुरुषावर आळ घेतोस काय? थांब, चोरा तुझें डोकेंच फोडतों.... .... .... ...

असें बोलून तो शकाराच्या अंगावर उसळला. आणि त्या दोघांच्या मारामारींत मैत्रेयाच्या काखोटींतलें गांठोडें खालीं पडून आवाज झाला. तेव्हां तें उचलून घेऊन शकार म्हणाला, हाच मुद्दा! हेच वसंतसेनेचे अलंकार !!

**म्हा०**— हे तसे दिसतात, पण हे ते नव्हेत.

**न्या०**— आर्या, हे दागिने कोणाचे?

**चा०**— वसंतसेना माझ्या घरावरून जातांना तिनें हे माझ्या मुलाला गाडी करण्यासाठीं दिले होते. मी मुळींच पाप केलें नाहीं.

**न्या०**— अरे दूतांनो, या चारुदत्ताच्या मुसक्या बांधा.

**चा०**— आपण बलात्कारानें माझ्यावर आरोप ठेवतां, तर माझा काय उपाय?

**म्हातारी**— माझी मुलगी मेली ती मेली; तिचें आयुष्य संपलें. तिच्याकरितां या श्रेष्ठ पुरुषास मारूं नये. या कज्जांत मी वादी आहें व हा श्रेष्ठी प्रतिवादी. याच्यावर माझा मुळींच आरोप नाहीं; यासाठीं आपण याला सोडावें.

**न्या०**—बाई, या बाबतींत तुमचें बोलणें कांहीं उपयोगीं नाहीं. न्याय करणें आम्हांकडे आहे. ह्या अपराधाबद्दल मी याला हद्दपारीची शिक्षा सांगतों.

पण न्यायमूर्तींच्या निकालास न अनुसरतां पालक राजानें असा हुकूम फर्माविला कीं, चारुदत्तानें ज्या ठिकाणीं वसंतसेनेचा घात केला त्याच स्थळीं उद्यानांत त्यास सुळीं द्यावें.

चारु०—हरहर ! मला ही दशा येईल असें स्वप्नांतसुद्धां वाटलें नव्हतें! दैवाची गति विचित्र आहे असें म्हणतात, तें खोटें नाहीं.[1] पालक राजास कांहींच सारासार विचार नाहीं. काय हा अविवेक!! हे राजा, शत्रूच्या वचनावर विश्वास टाकून, योग्य चौकशी न करितां तूं माझा ब्राह्मणाचा अन्यायानें वध करीत आहेस, याचा तुला परमेश्वर दरबारीं जाब द्यावा लागेल. या घोर पातकाबद्दल तुला अक्षय्य नरकवास घडो असा माझा तुला शाप आहे.

नंतर शांतपणें व गंभीरमुद्रेनें तो मैत्रेयाकडे वळून म्हणाला, मित्रा, माझ्या बाळाचा तूं प्रतिपाल कर. जा, माझ्या पुत्राची व माझी एकवार शेवटची भेट करीव.

मैत्रेयानें साश्रुनयनांनीं उत्तर दिलें, 'तुझा अंत झाल्यावर मी कसा बरें जिवंत राहणार?' असें बोलून तो हुंदके देत देत निघून गेला.

दोन चांडाळ चारुदत्तास वधस्तंभाकडे घेऊन चालले. प्रत्येक चव्हाट्यावर ते दवंडी पिटूं लागले; ती अशी:—

'ऐकाहो, लोक, ऐका. धनलोभास्तव वसंतसेनेचा घात करणाऱ्या चारुदत्ताला सुळीं देण्याची पालक राजानें आज्ञा दिली आहे; जर दुसरा कोणी असें कर्म करील तर त्यालाहि पालकराजा हेंच शासन करील.'

चारुदत्ताचें अखेरचें दर्शन घेण्याकरितां लोकांची तुफान गर्दी लोटली. ती पाहून चांडाल म्हणाले, पौरहो, आपल्या नगराचें भूषण जो चारुदत्त त्यास अशा विपत्तींत काय पाहतां ? दूर व्हा. दूर व्हा. या चारुदत्तास आपल्या पुत्रास एकवार भेटूं द्या.

---

१ पुरुषभाग्यानामचिन्त्याः खलु व्यापाराः ।

मैत्रेयभटजी रोहसेनास घेऊन आल्यावर चारुदत्त त्यास मिठी मारून म्हणाला, 'बाळा, हें घे माझें यज्ञोपवीत; एवढेंच माझें सत्तेचें आहे. ब्राह्मणास हें मोठें भूषण आहे,'[१] याच्या योगानेंच यज्ञयागांनीं देवांची व श्राद्धें करून पितरांची तृप्ति करितां येते.

**रोहसेन**--अरे चांडालांनो, माझ्या बाबांना कोठें रे नेतां ?

**चांडाल**--लेंकरा, आम्ही जातीनें मात्र चांडाल, कृतीनें नव्हे. आम्ही यास मारीत नाहीं; राजाज्ञा मारीत आहे. आम्हीं काय करावें ?

**रोहसेन**--बरें, तर तुम्ही मला मारा आणि माझ्या बाबांना सोडून द्या.

**मैत्रेय०**--अहो, मला मारा आणि माझ्या मित्राला सोडा.

**चारु०**--मी मरणाला भीत नाहीं,[२] पण माझ्या कीर्तीला कलंक लागला याचेंच मला दुःख वाटतें.

तेथें जमलेल्या लोकांना चारुदत्त अपराधी असेल असें मुळींच वाटलें नाहीं; शकाराची स्वारी मात्र तेथें मौज पाहण्यास आली होती. तो हसत हसत म्हणाला, शत्रूचा नाश होत असलेला आपल्या नेत्रांनीं पाहणें यांत माझ्या मनास मोठा आनंद होत आहे. या भिकारड्याला मारावयास नेत असतांना त्याला पाहण्याला लोकांची इतकी गर्दी झाली; मग माझ्यासारख्या श्रेष्ठ पुरुषास मारावयास नेऊं लागले तर मुंग्यासारखीं माणसें लोटतील !

असें बोलून तो थांबला नाहीं; तर 'चारुदत्ताच्या पाठीवर कोरडे ओढा, याचें डोकें उडवा, बघतां काय' अशी तो चांडाळांस घाई करूं लागला. तेव्हां त्या दोघांपैकीं एक चांडाळ म्हणाला, माझ्या वडिलांनीं मला असें सांगितलें आहे कीं, ज्या वेळेस तुझ्यावर वध करण्याची पाळी येईल त्या वेळीं एकदम वध करूं नकोस; कारण राजास

---

१ यज्ञोपवीत नाम ब्राह्मणानां विभूषणम् ।

२ न भीतो मरणादस्मि केवलं दूषितं यशः ।

पुत्र झाल्यास वध्य पुरुष मुक्त होतो; अथवा राज्यक्रान्ति झाली तर सर्वच बंदिवान मुक्त होतात !!

दुसरा चांडाळ तरवार उगारून म्हणाला, चारुदत्ता, वर छाती करून ताठ उभा रहा. इतक्यांत आपली उगारलेली तरवार खालीं पडली असें पाहून तो म्हणाला, ज्याअर्थी तरवार पडली, त्याअर्थी चारुदत्ताचें मरण टळलें असेंच मला वाटतें. हे देवा, कृपा करून या चारुदत्ताचे प्राण वांचविलेस तर या आमच्या चांडाळकुळावर उपकार केल्याप्रमाणें होईल !

चांडाळाचें गाऱ्हाणें देवानें ऐकलें म्हणून कीं काय कोण जाणे, एक भगवीं वस्त्रें परिधान केलेला संन्यासी व एक लावण्यवती स्त्री त्या स्थळीं अकस्मात् येऊन दाखल झालीं !

**चांडाळ**—अरे, ही वसंतसेना ! बरें झालें आम्हीं ह्या साधूस मारलें नाहीं म्हणून.

**शकार**—हो हो ! अरे ही जिवंत कशी झाली ? आतां येथें राहून उपयोगी नाहीं.

असें बोलून त्यानें घाईघाईनें आपलें तोंड काळें केलें.

**चारु०**-अरे ! हें काय स्वप्न आहे; का ही माया आहे! का ही दुसरीच कोणी वसंतसेना आहे ? का वसंतसेना मृत झाली हेंच मुळीं खोटें.

चारुदत्तास पाहून वसंतसेनेस अत्यंत आनंद झाला व ती त्याच्या पायां पडून म्हणाली, 'जिला मारल्याचा आरोप आपणांवर आला व राजानें आपणांस दोषी ठरविलें तीच मी अभागी वसंतसेना. या पापिणीला क्षमा करावी. त्या मेल्या राजश्यालकानें मला मारिलें; मेल्येंच होते, पण आपल्या पुण्याईनें वांचल्यें.'

**चारु०**— हा सारा दैवाचा खेळ! बरें हा कोण ?

**वसंतसेना**—ज्या महाभागानें मला वांचविलें, तो हा संन्यासी.

**चारु०** — ( संन्याश्यास ) बाबा, तूं धर्मात्मा आहेस. आह्मां उभयतांचे प्राण तूंच वांचविलेस.

**संन्याशी**— वसंतसेनेनें मला द्यूतकारांच्या तावडींतून सोडविल्यानंतर मी संन्यस्तवृत्तीचा अंगिकार केला व माझ्या जीविताचें सार्थक झालें असें मला वाटतें. गाडीच्या अदलाबदलीनें वसंतसेना पुष्पकरंडक उपवनांत आल्यावर शकारानें हिचा गळा दाबून हिला मूर्च्छित केलें; त्या वेळीं मला जेवढें साहाय्य करतां आलें तेवढें मीं केलें.

अशा प्रकारें त्यांचें बोलणें होत आहे, तोंच शर्विलक जयघोष करीत तेथें आला. 'दुष्ट पालकाचा वध करून आर्यकानें त्याची गादी पटकाविली आहे. आणि या महोत्सवप्रसंगीं त्यानें चारुदत्तास बंधमुक्त करून कृतज्ञतेचें द्योतक म्हणून त्यास कुशावती नगरीचें राज्य दिलें आहे. '

हें अत्यानंदाचें वर्तमान चारुदत्तास निवेदन करून 'मींच आपलें घर फोडून दागिने लांबविले, तरी मला अभय द्यावें' असें त्यास शर्विलकानें पश्चात्तापपूर्वक विनविलें.

त्यावर चारुदत्त म्हणाला, 'तूंच मला वसंतसेनेच्या स्नेहाचा लाभ करून दिलास.'

इकडे आर्यकाच्या शिपायांनीं शकारास पकडून आणून चारुदत्तापुढें उभें केलें. तेव्हां शकार हात जोडून म्हणाला, 'आर्या, मी शरण आलों आहें, पुनः असें कदापि करणार नाहीं.'

'शरणागतास[१] मारणें उचित नाहीं' असे उद्गार काढून आपल्या स्वाभाविक औदार्यबुद्धीनें चारुदत्तानें त्यास सोडून देण्यास सांगितलें.

'वा ! किती मौज झाली ! मी यमाच्या दाढेंतून सुटलों,' असें ओरडत व टिऱ्या बडवीत शकाराची स्वारी तेथून चालती झाली.

---

१ अभयं शरणागतस्य ।

राजाज्ञेनें चारुदत्त व वसंतसेना यांचा विवाह झाला.

जिकडे तिकडे आनंदाचें साम्राज्य नांदूं लागलें. लोकांच्या हृद-यांत एकाच वेळीं निरनिराळ्या भावना उचंबळल्या! क्षणभर लोकांना शकाराचा त्वेष आला, चारुदत्तास निष्कारण दुःख व यातना भोगाव्या लागल्या याबद्दल क्षणभर करुणा आली, वसंतसेनेचें आयत्या वेळीं आगमन झाल्याबद्दल क्षणभर विस्मय वाटला व अखेर शेवट गोड झाला याबद्दल सर्वांस अत्यंत हर्ष झाला!!!

---

# भासकृत स्वप्नवासवदत्त*

## पात्रें

**उदयन**–कौशांबीनगरीचा राजा.
**वासवदत्ता**–उदयनाची पत्नी.
**यौगंधरायण**–उदयनाचा मुख्य प्रधान.
**पद्मावती**–उदयनाची द्वितीय पत्नी. मगधदेशच्या राजाची भगिनी.

ज्या शहराला आपण प्रयाग असें म्हणतों त्याच्या पश्चिमेस पूर्वी कौशांबीनामक एक नगर होतें. तेथें उदयन नांवाचा एक राजा राज्य करीत होता. तो मोठा हौशी असून गायनवादन-कलेंत कुशल होता. रानटी हत्तींची शिकार करून त्यास धरून आणण्याचा त्याला नाद होता. वीणेच्या स्वरावर हत्तीला भुलवून तो त्यास वश करून घेत असे.

उज्जयिनी नगरीचा राजा प्रद्योत यास वासवदत्ता नांवाची एक कन्या होती. तिच्याशीं उदयनाचा विवाह झाला. तेव्हांपासून त्याला वासवदत्तेखेरीज कांहीं सुचेनासें झालें. राज्यकारभारांतून त्याचें मन पार उडून गेलें. अर्थात् शत्रूंना फावलें व त्याचा परिणाम असा झाला कीं, अरुणिनामक त्याच्या एका प्रबल प्रतिस्पर्ध्यानें कौशांबीच्या राज्याचा बराचसा भाग जिंकून घेतला.

उदयनाच्या मंत्रिमंडळांत यौगंधरायण नांवाचा एक स्वामिभक्त व चतुर प्रधान होता. गेलेलें राज्य कसें परत मिळवावें ह्या विवंचनेंत

---

* राजास वासवदत्ता अगोदर स्वप्नांत दिसली व मग तिची प्रत्यक्ष भेट झाली या प्रसंगावरून भास कवीनें या नाटकास स्वप्नवासवदत्त असें नांव दिलें आहे.

तो असतां एका साधूनें त्यास सांगितलें कीं, 'मगधराजाची भगिनी पद्मावती व उदयन यांचा विवाह घडून आला तर उदयनास गेलेल्या राज्याची प्राप्ति होईल.'

हें कसें घडून यावें, वासवदत्तेचा त्याग करून अन्य स्त्रीशीं विवाह करण्यास राजा तयार होईल हें शक्य आहे काय, अशा प्रकारें त्याच्या डोक्यांत विचार घोळत असतां, त्याला एक तोड सुचली. ती त्यानें गुप्तपणें वासवदत्तेच्या कानावर घातली. वासवदत्ता विचारी व धोरणी असल्यामुळें तिला प्रधानाची युक्ति तत्काळ पटली. गेलेलें वैभव कसें एकदा परत मिळेल, असें तिलाहि झालें होतें.

एके दिवशीं उदयन शिकारीस गेला असतां, एकाएकीं त्याच्या राजवाड्यास आग लागली आणि जिकडे तिकडे अशी बातमी पसरली कीं, या आगींत वासवदत्ता सांपडली; यौगंधरायणानें तिला सोडविण्याकरितां आगीच्या लोळांत उडी घेतली, पण त्याच्या साहसाचा कांहीं-एक उपयोग न होतां तीं दोघेंहि जळून खाक झालीं! वास्तविक तसा प्रकार झाला नसून तीं आगींतून सुरक्षित बाहेर पडून वेषांतर करून इष्ट हेतू साधण्याकरितां तेथून निघून गेलीं होतीं.

वासवदत्ता आगींत दग्ध झाल्याचें दुःखकारक वृत्त हां हां म्हणतां वणव्याप्रमाणें इतक्या दूरवर गेलें कीं, तें राजाच्या कानावर जाऊन तो मूर्च्छित होऊन पडला. तो तिला जिवापलीकडे जपत असे. कांहीं वेळानें सावध झाल्यावर "हा प्रिये, हे वासवदत्ते," असा मोठमोठ्यानें आक्रोश करीत तो शोक करूं लागला. 'आतां या जगांत जगून काय लाभ?' असे उद्गार काढून तो जीव देण्यासहि उद्युक्त झाला. तेव्हां त्याच्या मंत्रिमंडळानें त्याचें सांत्वन करून त्यास आत्महत्येपासून परावृत्त केलें.

या गोष्टीस कांहीं काळ लोटल्यावर मंत्रिमंडळानें राजास अशी विनंती केली कीं, 'महाराज, आपण निपुत्रिक आहांत, निपुत्रिकास

परत्र सद्गति मिळत नाहीं, तेव्हां आपण मगधदेशाच्या राजाच्या भगिनीशीं विवाह करावा. हा विवाहयोग घडून आल्यास त्या राजाच्या मदतीनें आपलें राज्य आपणांस परत मिळेल, असें एका साधूनें आम्हांस सांगितलें आहे.'

राजानें बराच वेळ विचार करून या गोष्टीस संमति दिली व पद्मावतीस मागणी घालण्यासाठीं मगधदेशीं दूत रवाना केले.

इकडे यौगंधरायण व वासवदत्ता वेष पालटून नगराबाहेर पडलीं. अर्थात् तीं दोघें दग्ध झाल्याची वदंता यौगंधरायणानेंच मुद्दाम उठविली होती. त्यांत त्याला अखेर काय साधावयाचें होतें हें चाणाक्ष वाचकांच्या लक्षांत आलें असेलच.

फिरतां फिरतां तीं एका आश्रमांत आलीं. यौगंधरायणानें तपस्व्याचें व वासवदत्तेनें तापसीचें रूप घेतलें होतें. कर्मधर्मसंयोगानें त्याच आश्रमांत पद्मावती आपल्या आजीस भेटावयास आली होती. तिची आजी वृद्ध झाल्याकारणानें ह्या आश्रमांत तापसी होऊन राहिली होती. पद्मावती तिच्याकडे वारंवार येई व आली म्हणजे बराच दानधर्म करी. राजभगिनीच ती; तिला काय कमी होतें ? त्या समयीं तिनें अशी द्वाही फिरवली कीं, 'कोणींहि पद्मावतीकडे येऊन आपणास काय पाहिजे असेल तें मागून घ्यावें; त्याची इच्छा तृप्त केली जाईल.'[1]

ही संधि साधून त्या तापसरूप यौगंधरायणानें पद्मावतीस अशी विनंती केली कीं, 'हे राजभगिनी, मला धन नको; मला एकच मागणें मागावयाचें आहे. तें हें कीं, माझी ही बहीण तूं 'ठेव' म्हणून आपल्याजवळ ठेव. मी हिला कांहीं दिवसांनीं घेऊन जाईन. हिच्या नवऱ्याचा मी शोध करीत आहें. तो कोठें प्रवासास गेला असल्याचें ऐकतों.

---

१ यद्यस्यारित समीप्सितं वदतु तत् कस्याद्य किं दीयताम् ।

ही चमत्कारिक मागणी ऐकून पद्मावती विस्मित झाली. तथापि तिला आपला शब्द खरा करावयाचा होता. म्हणूनच तिनें ही जोखीम आपल्या शिरावर घेतली. कारण, कोणाचीहि ठेव सांभाळणं म्हणजे मोठें जोखमीचें काम. त्यांतून ही पडर्का बायको माणूस. नंतर 'बरें आहे, मी हिला आपल्या सखीप्रमाणें वागवीन, तुम्ही अगदीं काळजी करूं नका', अशा शब्दांनीं तिनें यौगंधरायणास आश्वासन दिल्यावर तो निघून गेला.

पुढें कांहीं दिवसांनीं आजीचा निरोप घेऊन पद्मावती आपल्या भावाकडे आली. अर्थात् आपणाबरोबर तिनें आपल्या नूतन सखीसहि आणिलें होतें. तिचें नांव अवंतिका. तिचें बोलणे फार मोहक असे. पद्मावतीशीं बोलतां बोलतां कांहीं गोष्टी सहज निघाल्यावरून तिनें उदयन राजाची अतोनात प्रशंसा केली. तो फार देखणा, शूर व गुणवान् आहे असें त्याचें वर्णन चाललें असतां पद्मावतीस आनंदाच्या उकळ्या येत होत्या; कारण, त्याला तिनें पूर्वींच मनानें वरलें होतें. ती खोदून खोदून अवंतिकेस प्रश्न विचारूं लागली. तिच्या भावालाहि आपल्या रूपवती व गुणवती भगिनीस उदयनच योग्य वर आहे असें वाटत होतें. त्यामुळें मागणी घालण्यासाठीं दूत आलेले पाहतांच सर्वांस अत्यानंद झाला.

झालें ! लग्न ठरलें. उदयन मगधदेशांत येऊन दाखल झाला. तेथें मोठ्या थाटानें विवाहसमारंभ झाल्यावर तो आपल्या सासुरवाडीस बरेच दिवस राहिला.

मंत्रिमंडळाच्या आग्रहावरून पद्मावतीशीं त्याचा विवाह झाला खरा, पण त्याला वासवदत्तेचें स्मरण झालें नाहीं असा एक दिवस काय, पण एक क्षणहि जात नसे. कोणी भेटलें तरी त्याच्याशीं

---

१ दुःखं न्यासस्य रक्षणम् ।

तो तिच्याच गोष्टी बोले. खुद्द पद्मावतीशींहि तो वासवदत्तेचेंच गुणवर्णन करून शोक करी. पद्मावतीचा स्वभाव फार गोड होता. ती म्हणे, वासवदत्ता जिवंत असती तर तिच्याशीं आपण सख्ख्या बहिणीप्रमाणें वागलों असतों. व असें बोलून तीहि हळहळे. तिच्या निर्मत्सरी स्वभावामुळें राजास तीहि आवडूं लागली.

एकदा असें झालें कीं, पद्मावतीचें कपाळ फार दुखूं लागलें. म्हणून समाचार घेण्यासाठीं राजा तिच्या मंदिरांत गेला; पण पाहतो तों राणीसाहेबांची स्वारी तेथें नाहीं असें त्यास आढळून आलें. मग तो तेथेंच तिची मार्गप्रतीक्षा करीत बसला असतां त्यास झोंप लागली.

थोड्या वेळानें दासीकडून निरोप येतांच, अवंतिका पद्मावती-साठीं औषधें घेऊन घाईघाईनें तेथें आली. त्या वेळीं राजा पांघरूण घेऊन खुशाल घोरत पडला होता; व योगायोग असा कीं, त्या समयींच त्याला वासवदत्तेचें स्वप्न पडत होतें; तें असें कीं, ती आपणांजवळ उभी राहून आपणांस उठवीत आहे. अवंतिकेला वाटलें कीं, पद्मावतीस झोंप लागली आहे; म्हणून ती तिला हलवूं लागली. राजा अर्धवट झोंपेंत डोळे उघडून पाहतो, तों खरोखरीच वासवदत्ता आपणांस उठ-विण्यास आली आहे, असा त्यास भास झाला.

उदयनाला पाहतांच अवन्तिका चपापली व लज्जित होऊन चटकन तिनें तेथून पाय काढला. तिला धरण्यासाठीं राजा मागोमाग धावला, पण दाराशींच अडखळून पडला. ती पडली चपळ; ती सांपडते थोडीच!

जरा वेळानें उदयन चांगला खडखडीत जागा झाला. ती खरोखरच वासवदत्ता आली होती का आपणांस नुसता भास झाला याचा त्यास उलगडा होईना. त्यामुळें तो अत्यंत खिन्न झाला. इतक्यांत आपली वीणा कोणी वाजवीत आहे असें त्यास वाटलें. नंतर शोधाअंतीं त्यास असें कळलें कीं, अवन्तिका वीणा वाजवून राणीसाहेबांची करमणूक

करीत आहे. त्याला स्वतःलाहि वीणावादनाचा नाद असून तो त्या कलेंत अत्यंत निपुण होता. म्हणून त्यानें मोठ्या उत्सुकतेनें ती पाहण्यास मागविली आणि बघतो तों, खरोखरच ती आपली घोषवती नांवाची वीणा!

'ही येथें कशी आली?' अशी सेवकांजवळ चौकशी करतां ते त्यास म्हणाले, 'एका रानांत झाडास अडकवलेली ती कोणास सांपडली. ती त्यानें राणीसाहेबांस आणून दिली'. नंतर राजा वीणेस उद्देशून म्हणाला, 'हे घोषवति, तुझी धनीण कोठें आहे? तूं तिला सोडून वनांत एकटीच लपून राहिलीस काय? लबाड कुठली!'

वीणेच्या दर्शनानें वासवदत्तेची एकेक आठवण काढून उदयन हळहळूं लागला. इतक्यांत एक शुभ वर्तमान त्याच्या कानीं आलें म्हणून निभावलें. नाहींतर त्याची काय अवस्था झाली असती कोण जाणे! मगधराजाच्या साहाय्यानें उदयनाच्या सेनापतीनें शत्रूचा पुरा मोड करून उदयनाचें गेलेलें राज्य परत मिळविलें. हेंच तें शुभ वर्तमान होय.

ही बातमी सर्वत्र पसरली. उदयनाच्या श्वशुरानें म्हणजे वासवदत्तेच्या वडिलांनीं त्यास उज्जयिनीहून अभिनंदनपर संदेश पाठविला. तसेंच त्यांनीं वासवदत्ता व उदयन यांची विवाहसमयीं काढलेली तसबीर त्याजकडे पाठविली. वासवदत्तेची तसबीर पाहतांच त्याच्या शोकास पुनश्च भरती आली.

त्या वेळीं पद्मावती राणी राजाच्या लगतच उभी होती; तजबीर न्याहाळून पाहतांच, अवन्तिकेचें या चित्राशीं फारच साम्य आहे, असें तिच्या नजरेस आलें. तेव्हां तिनें राजास म्हटलें, 'आर्यपुत्र, माझी सखी या देवीच्यासारखी अगदीं हुबेहूब आहे.'

राजा विस्मित मुद्रेनें म्हणाला, 'अस्सें,! तर मग बोलवा बघूं तिला इकडे.'

'छे, छे, ती आहे ब्राह्मण स्त्री. आपल्यापुढें ती कशी येईल? एका ब्राह्मणानें आपली बहीण 'ठेव' म्हणून कांहीं दिवस तिला मजजवळ ठेवली आहे. तिचा नवरा प्रवासास गेला आहे.' असें पद्मावतीनें उत्तर दिलें.

अशा प्रकारें बोलणें चाललें आहे, इतक्यांत एका द्वारपालानें वर्दी दिली कीं, उज्जयिनीचा एक ब्राह्मण येऊन राणीसाहेबांजवळ तो आपली ठेव परत मागत आहे.

राजाज्ञेनें ब्राह्मणास ताबडतोब आंत आणण्यांत आलें. येतांक्षणींच त्यानें उदयनाचा जयजयकार केला. त्याचा शब्द ऐकून व त्यास न्याहाळून पाहून राजा चकित झाला व क्षणभर विचार करून कांहीं बोलणार इतक्यांत पद्मावती अवंतिकेस घेऊन तेथें आली.

'आर्यपुत्राचा जयजयकार असो' असे अवंतिकेचे अकल्पित उद्गार ऐकतांच 'अरे, ही तर वासवदत्ता व हा तर यौगंधरायण' असे हर्षभरित होऊन उदयनाच्या मुखावाटे आनंदोद्गार बाहेर पडले. त्या वेळीं सर्वजणें गहिंवरलीं व गळा दाटून आल्यानें क्षणभर स्तब्ध राहिलीं.

राजानें दोघांसहि आलिंगन दिल्यावर यौगंधरायण म्हणाला, 'देवी वासवदत्तेस आपल्या दृष्टीआड करून आपणांस शोकांत पाडल्याबद्दल या दासाला क्षमा असावी. वासवदत्ता जिवंत असतां दुसरा विवाह करण्यास आपण कधींच सिद्ध झालां नसतां व तसें केल्याशिवाय नष्टप्राय झालेलें राज्य प्राप्त करून घेण्यास दुसरा कांहींच उपाय नव्हता.' असें म्हणून त्यानें आपण रचलेलें सर्व कारस्थान राजास विदित केलें. तें ऐकून राजाला संतोष वाटला व त्यानें त्यास क्षमा केली.

यौगंधरायणाचें साहस, कल्पकता व चातुर्य पाहून सर्वांस अत्यंत विस्मय वाटला व जो तो त्याची वाहवा करूं लागला! त्याप्रमाणेंच वासवदत्तेच्या पतिप्रेमाचें व स्वार्थत्यागाचें प्रत्येकास कौतुक वाटलें.

# भट्टनारायणकृत वेणीसंहार

## पात्रें

| | |
|---|---|
| धर्म, भीम, अर्जुन, नकुल, सहदेव — पांच पांडव | कृपाचार्य–अश्वत्थाम्याचा मामा |
| | कर्ण–दुर्योधनाचा मित्र |
| | सुंदरक–कर्णाचा दूत |
| | धृतराष्ट्र-दुर्योधनाचा पिता |
| | गांधारी–दुर्योधनाची माता |
| दुर्योधन–कौरवांचा राजा | संजय धृतराष्ट्राचा सारथी |
| दुःशासन–दुर्योधनाचा भाऊ | द्रौपदी पांडवांची पत्नी |
| भानुमती-दुर्योधनाची पत्नी | चार्वाक–एक राक्षस |
| द्रोणाचार्य–कौरवांचा सेनापति | श्रीकृष्ण अर्जुनाचा सारथी |
| अश्वत्थामा-द्रोणाचार्यांचा पुत्र | धृष्टद्युम्न-द्रौपदीचा भाऊ |

### भाग १ ला

[ संस्कृतांत 'संहार' या शब्दाचा एक अर्थ एकत्र करणें-बांधणें असा आहे. भीमानें आपली प्रतिज्ञा पूर्ण करून द्रौपदीची मोकळी वेणी एकत्र बांधली या गोष्टीस अनुलक्षून कवीनें या नाटकास वेणीसंहार असें नांव दिलें आहे. मुळांतील हा संस्कृत अर्थ बाजूस ठेवून, वेणी-संहार या मराठी शब्दप्रयोगानें सूचित होणाऱ्या 'नाश करणें' या अर्थाकडे लक्ष दिलें तरी या कथानकाची उग्र सत्यता प्रत्ययास येते. कारण खरोखरच द्रौपदीच्या वेणीनें भारतीय क्षत्रिय कुलाचा केवढा तरी संहार केला ! पांडवांचें सात अक्षौहिणी सैन्य व कौरवांचें अकरा अक्षौहिणी सैन्य होतें. एक अक्षौहिणी म्हणजे सरासरी तीन लाख माणसें. या हिशेबानें ५४ लाख माणूस या वेणीनें नाहींसें

करून टाकिलें! पांडवांकडील सात अक्षौहिणींतून फक्त सात शिल्लक राहिले! पांच पांडव, श्रीकृष्ण व सात्यकी. कौरवांकडील तीनच अवशिष्ट राहिले. धृतराष्ट्र, संजय व विदुर. काय प्रचंड संहार हा! जगाच्या इतिहासांत याला जोडच नाहीं!]

भारतीय युद्धाचें कारण काय? तर दुःशासनानें द्रौपदीची वेणी धरून तिला फरफटत ओढीत भर सभेंत आणिलें. तेव्हां दुर्योधनाच्या रक्तानें माखलेल्या हातांनीं मी स्वतः तुझी वेणी बांधीन (अर्थात् वेणीसंहार करीन) अशी भीमसेनानें प्रतिज्ञा केली व ती शेवटास गेल्यावर हें भारतीय युद्ध संपलें. हा कथाभाग या नाटकांत वर्णिला असल्यामुळें कवि भट्टनारायण यानें त्यास वेणीसंहार असें यथार्थ नांव दिलें आहे. तेंच कथानक मी थोडक्यांत येथें सांगणार आहें.

श्रीकृष्ण कौरवांकडे शिष्टाई करण्यास गेला हें भीमसेनाला मुळाच न आवडून तो अत्यंत क्रुद्ध झाला व सहदेवाला म्हणाला, 'अरे, तूं धर्मराजास माझा निरोप सांग कीं, फार दिवसांपासून धुमसत असलेल्या कोपाग्नीनें माझें हृदय जळत आहे. आपल्या आज्ञेचें उल्लंघन केल्याचें पाप लागूं नये म्हणून मी आजपर्यंत मूग गिळून बसलों होतों. आतां मी कोठवर दुःख सहन करावें? धृतराष्ट्रवंश उच्छिन्न करा असें माझी गदा मला सांगत आहे. आपण पांच गांवें ( इंद्रप्रस्थ, वृकप्रस्थ, जयन्त, वारणावत आणि पांचवें कोणतें तरी) घेऊन खुशाल कौरवांशीं संधि करा. पण मी जेव्हां शंभर कौरवांचा निःपात करून दुःशासनाचें रक्त घटघटा पिईन आणि दुर्योधनाच्या मांडीचें चूर्ण करीन तेव्हांच शांत होईन'.

अशा प्रकारें भीम आवेशानें निरोप सांगत आहे, इतक्यांत डोळ्यांतून अश्रुधारा गाळीत द्रौपदी भीमसेनाकडे येत आहे असें सहदेवानें पाहिलें. परंतु रागाच्या भरांत भीमाचें तिजकडे लक्ष गेलें नाहीं. ती अगदींच जवळ आल्यावर तिच्याकडे लक्ष जाऊन भीमानें तिला

म्हटलें, 'द्रौपदि, क्रोधाच्या आवेशामुळें तुला येतांना मीं पाहिलें नाहीं याबद्दल मला क्षमा कर.'

द्रौपदीनें उत्तर दिलें, 'आपण उदासीन राहिलांत तरच मला कोप येईल. आपण क्रुद्ध झालांत तर मला आपला मुळींच राग येणार नाहीं.'

नंतर भीमानें तिला उद्विग्नतेचें कारण विचारलें तेव्हां द्रौपदीचा कंठ दाटून आला व मुखावाटे शब्दहि बाहेर निघेना. तेव्हां तिची दासी मध्येंच म्हणाली,

'काल बाईसाहेब गांधारीसासुबाईंस वंदन करण्यास गेल्या असतां भानुमतीबाईंनीं त्यांस असा टोमणा दिला कीं, 'अगे याज्ञसेनि, तुझे पांच पति पांच गांवांची भीक मागत आहेत असें ऐकतें. मग अजून तुझी वेणी मोकळी कां बरें? बांधीत कां नाहींस?' बाईसाहेब खिन्न व म्लान असण्याचें हेंच कारण! भानुमतीबाईंना मींच त्या वेळीं असें खरमरीत उत्तर दिलें कीं, तुमचे केस अद्याप मोकळे झाले नाहींत तर आमच्या बाईसाहेब आपली वेणी कशी बांधतील? हें माझें उत्तर उरांत सुरी टोंचल्याप्रमाणें त्यांस झोंबलें.

'शाबास! शाबास! आमच्या दासीस योग्य तेच बोललीस.' अशी दासीस शाबासकी देऊन भीम द्रौपदीकडे वळून म्हणाला,

'फार काय सांगूं, द्रौपदी, माझ्या हातांत सदैव नर्तन करणाऱ्या या गदेनें सुयोधनाची मांडी फोडून तींतील रक्तानें माखलेल्या हातांनीं तुझी वेणी बांधीन तेव्हांच मी तुला तोंड दाखवीन! तूं कां काळजी करतेस?'

अशा प्रकारें भीम द्रौपदीस आश्वासन देत असतां रणदुंदुभि, भेरी वगैरे रणवाद्यांचा प्रचंड घोष त्या सर्वांच्या कानावर येऊन आदळला. तेव्हां 'दादा, हें पहा युद्ध पुकारलें आहे. संधि होत

नाहीं! चला, चला, आपण जाऊं या,' अशी सहदेव भीमास घाई करूं लागला.

'हा मी सिद्ध झालों पहा. प्रिये, आतां जातों बरें कुरुकुलाचा निःपात करावयास,' असें बोलून भीमसेन जाऊं लागला.

त्यास निरोप देतांना डोळ्यांत अश्रू आणून द्रौपदी म्हणाली, 'युद्धाच्या आवेशांत आपण बेसावधपणें रणांगणावर संचार करूं नये. दैत्यांशीं युद्ध करण्याकरितां जेव्हां भगवान् विष्णु निघाले, तेव्हां त्यांस जे शुभशकुन झाले तेच आपणांस होवोत,' असें म्हणून ती निघून गेली.

इकडे ज्या दिवशीं भानुमती द्रौपदीस मर्मभेदक शब्द बोलली त्याच दिवशीं तिला अनिष्टसूचक स्वप्न पडलें. तें असें–

ती प्रमदवनांत बसली असतां तिच्यापुढें एक नकुळ ( म्हणजे मुंगुस) आलें व त्यानें शंभर साप मारिले. हें स्वप्न ऐकून तिची सुवदना नामक दासी सचिंत मुद्रेनें म्हणाली, 'इडा पिडा टळो व अमंगळ पळो. बाईसाहेब, देवतांच्या आराधनेनें या दुष्ट स्वप्नाचा परिहार होईल. जन्मजात वैर असणाऱ्या प्राण्यांचें दर्शन व तशांत नकुळाकडून मारल्या गेलेल्या सर्पांची कौरवांच्या संख्येइतकी शंभर ही संख्या ऐकून मन चिंतामग्न होतें. अशा प्रकारचें स्वप्न चांगलें नव्हे असें म्हणतात.' भानुमतीसहि मनस्ताप होऊं लागला. तिनें सूर्याकडे तोंड करून प्रार्थना केली कीं, 'हे भगवान सूर्यनारायणा, या स्वप्नानें जें अनिष्ट सुचविलें असेल तें टळो. माझ्या पतिराजांचें भ्रातृगणांसह कुशल असो.'

थोड्याच दिवसांत भारतीय युद्धास सुरवात झाली. दहा दिवस पराक्रम करून भीष्माचार्य शरपंजरीं पडल्यावर दुर्योधनानें द्रोणाचार्यांस सैनापत्याचा अभिषेक करविला. त्यांनीं चक्रव्यूह रचून सैन्याची विल-

क्षण मांडणी केली. अभिमन्यूनें चक्रव्यूहांत शिरून दिव्य पराक्रम केला व शेंकडों वीर ठार मारिले. हें पाहून जयद्रथ, कर्ण आदिकरून वीर खवळले व त्या सर्वांनीं मिळून अभिमन्यूवर हल्ला करून तो व्यूहांत एकटाच सांपडला असतां त्याचा अधर्मानें घात केला.

हें वर्तमान ऐकून दुर्योधनास हर्षातिशय झाला व कौरववीरांचें अभिनंदन करण्याकरितां तो जात असतां त्यास असें वाटलें कीं, जातां जातां सहज अभिमन्युवधाची ही आनंददायक वार्ता आपण भानुमतीस सांगितली असतां तीस बरें वाटेल. म्हणून तो रणांगण सोडून आपल्या शिबिराकडे जावयास निघाला.

वाटेंत त्याचा डावा डोळा स्फुरण पावूं लागला. तेथें पोहोंचतांच भानुमतीनें वर वर्णिलेलें तिला युद्धापूर्वी पडलेलें स्वप्न त्याच्या कानावर घालून ब्राह्मणांच्या वेदघोषानें व अग्नीच्या हवनानें अरिष्टाची शांति करण्यास त्यास विनाविलें. तेव्हां पूर्वचिन्हांची अशुभसूचकता दुर्योधनाच्या प्रत्ययास आली. तथापि तो गर्वानें म्हणाला, 'कशाची शांति व कसलें अरिष्ट ! हीं[१] दुश्चिन्हें व अरिष्टें भित्र्यास भिववितात ! हा दुर्योधन त्यांची काय पर्वा करणार ! बरें, तुझी इच्छाच असली तर तसें कां होईना' असें तीस आश्वासन देऊन लागलीच त्यानें 'जा, पुरोहितास अनिष्टाच्या परिहारार्थ शांति करण्यास सांगा' असा दासीकडून निरोप पाठविला.

कांहीं वेळानें जयद्रथाची आई तेथें रडत रडत येऊन सांगूं लागली कीं, अभिमन्युवधानें त्याचा बाप अर्जुन प्रक्षुब्ध झाला आहे व

---

१ ग्रहाणा चरितं स्वप्नाऽनिमित्तान्युपयाचितम् ।
फलन्ति काकतालीयं तेभ्यः प्राज्ञा न बिभ्यति ॥

अर्थ:—ग्रहांच्या गति, स्वप्नें, अपशकून व नवस हीं काकतालीय न्यायानें म्हणजे यदृच्छेनें फळाला येतात; म्हणून जाणते लोक त्यांना भीत नाहींत.

त्यानें अशी घोर प्रतिज्ञा केली आहे कीं, 'सूर्यास्तापूर्वी मी जयद्रथाचा वध करीन, नाहींतर अग्निकाष्ठांचें भक्षण करीन.'

तेव्हां दुर्योधन उपहासपूर्वक म्हणाला, 'अर्जुनाच्या ह्या वृथा वल्गना आहेत. तुम्ही कां उगीच घाबरतां ? पांडवांचा रोष कितपत आहे तो राजसभेंत सर्वांस कळून चुकला आहे. त्या वेळीं धनुर्धारी अर्जुनाची लाजलज्जा कोठें गेली होती ? आत्याबाई, तुम्ही स्वस्थ असां. कांहीं काळजी करूं नका. कृपाचार्य, द्रोणाचार्य, कर्ण आदि करून महारथी व आम्ही शंभर भाऊ जयद्रथाचें संरक्षण करण्यास तत्पर आहोंत. हा मी युद्धभूमीवर जाऊन अर्जुनाची प्रतिज्ञा सिद्धीस न जाऊं देतां त्यासच अग्निकाष्ठांचें भक्षण करण्यास लावण्याचा घाट घडवून आणतों.'

युद्ध सुरू होतेंच. भीमार्जुनांनीं कौरवसैन्याचा फडशा उडवून व्यूहरचना फोडली. तळहाताला अर्जुनाचा बाण लागल्यामुळें दुर्योधनास असह्य वेदना होऊं लागल्या, म्हणून त्यानें पलायन केलें. अर्जुनानें एका बाणानें जयद्रथाचें मस्तक उडवितांच कौरव अश्रू गाळूं लागले व पांडवांनीं जयाच्या आरोळ्या ठोकल्या. जयद्रथ गतप्राण झाल्याचें ऐकून दुर्योधनास मेल्याहूनहि मेल्यासारखें झालें. दांत पाडलेल्या सर्पाप्रमाणें हतवीर्य होऊन तो नुसते रोषाचे सुस्कारे टाकूं लागला.

पण द्रोणाचार्यांपुढें अर्जुनाचें कांहीं चालेना. पांडवपक्षावर आचार्यांनीं असा कांहीं भयंकर मारा चालविला होता कीं, आपलें सैन्य समूळ नाहींसें होतें कीं काय असें अर्जुनास वाटूं लागलें. अशा स्थितींत भगवान श्रीकृष्णानें कपटयुद्ध करण्याचा धर्मास सल्ला दिल्यावरून त्यानें 'अश्वत्थामा मारला गेला' असे शब्द द्रोणाचार्यांस ऐकूं जातील इतक्या मोठ्यानें उच्चारले व लागलींच मागाहून 'अश्वत्थामा नांवाचा हत्ती' असें हळूंच म्हटलें.

पण याचा परिणाम काय झाला?

प्रारंभींचा अश्वत्थामा हा नुसता शब्द कानीं पडतांच, द्रोणाचार्य पुत्रशोकानें विव्हळ होऊन त्यांच्या डोळ्यांतून अश्रू आणि हातांतून शस्त्रें एकाच वेळीं गळून पडलीं. ती संधि साधून धृष्टद्युम्नानें द्रोणाचार्यांचे केस धरून, चोहोंबाजूंनीं 'हें काय, हें काय,' असें योद्धे ओरडत असतां, तलवारीनें त्यांचें मस्तक उडविलें.

द्रोणाचार्यांचें सैन्य सैरावैरा पळूं लागलें. डाव्या बाजूस त्यांचा पुत्र अश्वत्थामा लढत होता, तेथेंहि पळापळ सुरू झाली. तेव्हां तो आश्चर्यचकित होऊन स्तब्ध झाला. इतक्यांत सारथ्यानें घाबऱ्या घाबऱ्या येऊन त्यास सर्व निवेदन केलें तेव्हां अश्वत्थाम्याच्या नेत्रांतून खळखळा अश्रुधारा वाहूं लागल्या.

"हा ताता, हा सुतवत्सला, माझ्यासाठीं आपण जीविताचा व्यर्थ त्याग केला. आतां मी कोणाकडे पाहूं?" असा शोक करीत त्यास मूर्च्छा आली.

त्याचे मामा कृपाचार्य यांस हें वर्तमान समजतांच ते खिन्न मनानें तेथें आले व भाच्याची अशी अवस्था पाहून म्हणाले,

"हाय हाय! द्रौपदीला केस धरून ओढल्याचा हा परिणाम! आज द्रोणाचार्यांच्या केशग्रहानें तर जणूं काय प्रळयकाळ ओढवला असें मला वाटतें. ज्यांच्या डोळ्यांदेखत हे दोन्ही प्रकार घडले त्या पांडवांना व आम्हांला धिक्कार असो."

नंतर "वत्सा, सावध हो, सावध हो" असें प्रेमानें म्हणत त्यांनीं अश्वत्थाम्यास सावध करण्याचा प्रयत्न केला. 'आतां व्यर्थ शोक करूं नकोस, उद्यां आपणांसहि जावयाचें आहे,' अशा प्रेमळ शब्दांनीं कृपाचार्य त्याचें समाधान करूं लागले. 'मामा,' अश्वत्थामा डोळ्यांत आसवें आणून म्हणाला, 'हा शोकभार माझ्यानें सोसवत नाहीं. जिकडे तात तिकडे मी चाललों पाहा'.

कृपाचार्य म्हणाले, मुला, असा अविचार करणें तुला योग्य नाहीं. पितरांचें ऋण फेडण्यास तूं या जगांतहि समर्थ होशील, व तूं जर कमर बांधलीस तर त्रैलोक्यहि तुझ्यापुढें उभें ठाकण्यास समर्थ होणार नाहीं. मला वाटतें तुला सैनापत्याचा अभिषेक करावा म्हणून राजा दुर्योधन तुझी वाट पाहात असेल. तर चल, चल आपण तिकडे जाऊं. असें म्हणून त्यांनीं अश्वत्थाम्यास दुर्योधनाच्या शिबिराकडे नेलें.

इकडे दुर्योधनाच्या शिबिरांत दुर्योधन व कर्ण यांचा कडाक्याचा वादविवाद चालला होता. विषय काय, तर 'द्रोणाचार्यांनीं शस्त्र-संन्यास कां केला ?'

**दुर्योधन**—कर्णा, मूळस्वभाव जात नाहीं म्हणतात तें अगदीं खरें. अंतःकरण शोकविव्हल झालें तेव्हां द्रोणाचार्यांनीं क्षात्रधर्मास उचित अशा कठोरवृत्तीचा स्वीकार करण्याऐवजीं ब्राह्मणजातीस सहज अशी मनाची कोमलता अंगिकारिली व शस्त्रसंन्यास केला. शेवटीं ब्राह्मण ते ब्राह्मण !

**कर्ण**—राजा, तूं म्हणतोस तशांतला प्रकार नाहीं. अश्वत्थाम्यास राज्यपदावर बसवावें असें द्रोणाचार्यांच्या मनांत होतें; पुत्र मृत झालेला ऐकतांच आतां शस्त्रग्रहण निष्फळ होय, असा विचार करून त्यांनीं शस्त्राचा त्याग केला. दुसरें काय ? कौरवपांडवांनीं परस्परांचा संहार करावा या हेतूनेंच त्यांनीं जयद्रथवधाचा प्रतिकार केला नसावा.

**दुर्योधन**—होय रे होय ! मित्रा, तुझा तर्क अगदीं बरोबर आहे. तसें नसतें तर जयद्रथवधाच्या वेळीं त्यांनीं अर्जुनाचें पारिपत्य केलेंच असतें.

असा दोघांचा संवाद चालला असतां कृपाचार्य व अश्वत्थामा तेथें येऊन पोहोंचले. दुर्योधनानें कृपाचार्यास वंदन करून अश्वत्थाम्यास दृढ आलिंगन दिलें. मग दुर्योधनास कृपाचार्य म्हणाले, राजा,

द्रोणाचार्यांच्या मागें अश्वत्थाम्यास सैनापत्याचा अभिषेक करावा असें मला वाटतें.

यावर दुर्योधनानें उत्तर दिलें, तुमची योजना फार चांगली आहे, परंतु मी पूर्वींच कर्णास या बाबतींत वचन देऊन चुकलों आहें. अश्वत्थामा म्हणाला, राजा, तूं माझ्यावर भार टाकून स्वस्थ झोंप घे; मी आजच्या आज पांडवांना व श्रीकृष्णाला नामशेष करून टाकतों.

ही प्रतिज्ञा ऐकून कर्णाच्यानें राहवेना; तेव्हां तो मध्येंच अश्वत्थाम्यास म्हणतो, बोलणें सोपें आहे, पण करणें कठीण![1] ज्याला दुःख झालें आहे त्यानें घरीं बसून अश्रू ढाळावे; उगीच बडबड काय कामाची?

**अश्वत्थामा**—अरे सूतपुत्रा, माझी तूं निंदा करतोस?

**कर्ण**—मी सूतपुत्र असों किंवा कोणीहि असों! सत्कुलांत जन्म येणें हें दैवाधीन आहे. पराक्रम करणें मात्र माझ्या हातचें आहे.[2]

**अश्व०**—अरे, तूं राजाचा आवडता झालास म्हणून मोठी प्रौढी मिरवतोस काय? हा मी पायानें तुझ्या डोक्यावर लत्ताप्रहार करितों; शक्ति असल्यास निवारण कर, असें म्हणून अश्वत्थाम्यानें खरोखरच कर्णावर आपली डावी लाथ उगारली. त्या वेळीं दुर्योधन व कृपाचार्य यांनीं त्याला मागें ओढून त्याचें निवारण केलें.

**कर्ण**—(त्वेषानें) अरे दुष्टा ब्राह्मणाधमा, तूं जातीनें ब्राह्मण आहेस म्हणून मला तुझा वध करतां येत नाहीं.

**अश्व०**—मूर्खा, मी जातीमुळें तुला अवध्य आहें काय? तर हें जातीचें चिन्ह माझें जानवें तोडून टाकतों पाहा. तर चल ये पुढें.

---

१ वक्तुं सुकरं अध्यवसितुं दुष्करम्।

२ दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम्।



अश्व०– (कर्णास) हें जातीचें चिन्ह–माझें जानवें– तोडून टाकतों पहा. ( पृ. ६६ )

असें बोलून दोघेहि एकमेकांच्या अंगावर धावले; पण पुनः याहि वेळीं कृपाचार्य व दुर्योधन यांनीं मध्ये पडून दोघांस दूर केलें.

त्या वेळीं अश्वत्थाम्यानें खड्ग फेकून देऊन अशी प्रतिज्ञा केली कीं, कर्ण शत्रूच्या हातून मारला जाईपर्यंत मी हातांत शस्त्र धरणार नाहीं. तेव्हां कर्णानें हसून म्हटलें, तुमच्यासारख्यांनीं शस्त्र हातांत धरिलें काय, किंवा टाकून दिलें काय सारखेंच!

इतक्यांत रणांगणावरील भयंकर कोलाहल त्यांच्या कानीं आला. त्यायोगें ते वाग्युद्ध तेवढ्यावरच थांबलें.

इकडे भीमदुःशासनाचें तुमुल युद्ध माजून राहिलें होतें.

'अरे नरपशो, आतां कोठें पळून जाशील? फार दिवसांनीं माझ्या तावडींत सांपडला आहेस' ही आकाशमंडळ व्यापून टाकणारी भीमाची भयकर गर्जना ऐकून, 'दुःशासना भिऊ नको, भिऊं नको, हे आम्ही तुझ्या साह्यार्थ आलों,' असा उद्घोष करीत कर्ण व दुर्योधन हे दोघेहि त्याच्या रक्षणार्थ धावून गेले. परंतु अर्जुनानें एकसारखी शरवृष्टि करून त्यास मध्येंच अडवून धरिलें. तेव्हां जवळपास असलेला अश्वत्थामा आपले मातुल जे कृपाचार्य त्यांस म्हणाला, हाय हाय! दुःशासनावरचें संकट माझ्यानें पाहवत नाहीं. पुनः शस्त्र हातीं न धरण्याविषयींची मी केलेली प्रतिज्ञा मोडूनहि मी त्याच्या साहाय्यार्थ जातों. प्रतिज्ञाभंगाच्या पातकाबद्दल मी दुर्गतीस गेलों तरी चालेल.

इतकें त्याचें बोलणें होतें न होतें तोंच अशी आकाशवाणी झाली कीं,

'हे अश्वत्थाम्या, सत्य वचन मोडणें हें तुला योग्य नव्हे; तूं आजपर्यंत असें कधींहि केलें नाहींस.'

हें ऐकून विस्मित होऊन तो म्हणाला, काय! ही देववाणी! देवहि

पांडवांचे पक्षपाती झाले काय? मामा, त्या सूतपुत्र राधेयाशीं वादास पेटून अविचाराच्या भरांत मी शस्त्रत्यागाची प्रतिज्ञा केली हें फार वाईट केलें. अहो मामा, तुम्ही तरी त्याच्या साह्यास धावा हो! अरेरे तें पाहा! प्रतिज्ञा केल्याप्रमाणें भीमानें दुःशासनास ठार मारून त्याच्या कंठांतील रक्त प्राशन केलेंदेखील!

असें बोलून अश्वत्थामा कृपाचार्यासह तिकडे वेगानें धांवत गेला.

भीमाचें तें रक्तानें माखलेलें अक्राळविक्राळ स्वरूप पाहतांच कौरवांचें सैन्य सैरावैरा इतस्ततः धावत सुटलें. इकडे दुसऱ्या बाजूस अर्जुनाच्या शरप्रहारांनीं दुर्योधन मूर्च्छित झालेला पाहून त्याच्या सारथ्यानें त्वरेनें दुसरीकडे रथ हाकण्यास सुरवात केली. इतक्यांत भीमहि आपणांकडेच चाल करून येत आहे असें त्यानें पाहिलें; तेव्हां दुर्योधन अजूनहि शुद्धीवर येत नाहीं म्हणून त्यानें थोड्या आडवाटेनें जोरानें रथ हाकून एका सरोवराकांठच्या निवांत व शीतल छायायुक्त वटवृक्षाखालीं तो उभा केला. सरोवराकडून आलेल्या सुगंधशीतल वायूच्या स्पर्शानें दुर्योधनमहाराज लवकरच भानावर येतील अशी त्यास आशा वाटत होती.

कांहीं वेळाने दुर्योधन अर्धवट शुद्धीवर आला व भ्रान्त स्थितींतच आवेशानें उठून बसून विलक्षण मुद्रेनें पाहात म्हणाला, दुःशासना भिऊं नकोस, हा मी आलो.

तेव्हां त्याचा सारथी पायांवर डोकें ठेवून गहिंवरून म्हणाला, आतां कसचें युवराज दुःशासन महाराजांचें रक्षण! दुष्ट वृकोदरानें आपली प्रतिज्ञा केव्हांच शेवटास नेली.

हे शब्द कानीं पडतांच दुर्योधन धाडकन् भुईवर पडून दुःखावेगानें व्याकुळ होऊन शोक करूं लागला.

---

## भाग २ रा

इकडे कर्णानें दुर्योधनाचा शोध करण्याकरितां सुंदरक नामक एक दूत पाठविला होता. तो इकडे तिकडे फिरून असे दुःखोद्गार काढूं लागला कीं, 'अठरा अक्षौहिणीचे जे स्वामी दुर्योधन महाराज त्यांचा शोध करण्याची पाळी यावी आँ ! हरहर ! सूर्यास अंधारांत शोधण्याचा प्रसंग आला. अथवा दैवास तरी काय बोल लावावा ! कौरवांनीं जो विषवृक्ष लाविला त्याचे हें फळ पक्वदशेस आलें !'

अशा तऱ्हेचे उद्गार काढीत तो इकडे तिकडे फिरत असतां निश्चेष्ट व मूर्च्छित पडलेले दुर्योधन महाराज त्याच्या नजरेस पडले. त्यांच्याजवळ जाऊन मोठ्यानें जयशब्द उच्चारतांच दुर्योधनाची त्याच्याकडे नजर गेली. तेव्हां दुर्योधनाने त्यास विचारलें, अरे सुंदरका, माझा मित्र कर्ण खुशाल आहेना ?

ऐकावें, महाराज, असें म्हणून सुंदरक सर्व हकीकत सांगूं लागला.

"दुःशासनाच्या वधामुळें कर्ण क्रोधानें संतप्त होऊन व भुवया वर चढवून भीमावर शरवृष्टि करूं लागला. तो बाण जोडतो केव्हां आणि सोडतो केव्हां हें कोणास समजेना. अशा समयीं अर्जुन आपल्या ज्येष्ठ भ्रात्याच्या मदतीस धावून आला व त्या दोघांशीं आपला बाप एकटाच झगडत आहे असें पाहून कर्णपुत्र वृषसेन पित्याच्या साह्यास गेला व अर्जुनाचा रथ त्यानें क्षणभरांत बाणांनीं आच्छादून टाकिला.

हें त्या कुमाराचें चापल्य व कौशल्य पाहून अर्जुनास अचंबा वाटला व हास्यमुद्रेनें तो म्हणाला, 'बाळा, तुझ्या ओंठावरचा अद्याप जारहि वाळल्या नाहीं, तेव्हां तूं आपल्या बरोबरीच्या मुलांशीं युद्ध कर.'

असें अवहेलनायुक्त भाषण ऐकून वृषसेन क्रोधानें लाल झाला व शरांची प्रभावशाली वृष्टि करूनच त्यानें अर्जुनास उत्तर दिलें.

'शाबास! शाबास!' असा दोन्ही सैन्यांत ध्वनि निघूं लागला. त्या योगानें अर्जुन जास्तच क्रुद्ध होऊन त्यानें तशीच वृषसेनावर प्रखर बाणवृष्टि केली व क्षणार्धांत त्याचें शिर धडापासून विलग केलें. त्याबरोबर पांडवसैन्यांत हर्षनाद दुमदुमूं लागला आणि कौरवांचें सैन्य करुणविलापांनीं भरून गेलें.

महाराज, कर्णाच्या रथाचे घोडे ठार झाले. त्यामुळें खालीं उतरून त्यानें कांहीं वेळ विश्रांति घेतली, आणि आपल्या मुकुटांतून एक सुवर्णाचा पत्रा काढला व त्यावर आपल्या शरिरांतील रक्तांत बाणाचें टोंक बुचकळून त्यानें कांहीं मजकूर लिहून आपणांस पाठविला आहे; तो महाराजांनीं वाचावा."

दुर्योधनानें उत्कंठेनें तें पत्र वाचलें. त्यांतील मजकूर येणेप्रमाणें:—

'भीमास मीं मुद्दाम मारिलें नाहीं, कारण तो आपला भाग आपणांसाठीं मीं मुद्दाम राखून ठेवला आहे. आतां आपण पराक्रम करून शत्रूला ठार तरी करा किंवा अश्रू ढाळून दुःखाचें निवारण करा.'

पत्र वाचून पुरें होत आहे तोंच आपलीं मातापितरें गांधारी व धृतराष्ट्र आपल्या भेटीस येत आहेत असें त्यास दिसलें; तेव्हां तो आपल्या सारथ्याकडे वळून म्हणाला, 'हाय! हाय! काय संकट हें! आज सकाळीं मी व दुःशासन वडीलमातुःश्रींस वंदन करून आलों; दुपारीं दुःशासन आम्हांस सोडून गेला; आतां कोणत्या तोंडानें मी त्या उभयतांचें समाधान करूं?'

धृतराष्ट्र व गांधारी संजयाच्या साह्यानें दुर्योधनाच्या समीप येऊन पोहोंचलीं. त्यांनीं हातांनीं अंग चांचपून पुत्रास आलिंगन दिलें आणि उभयतां कळवळ्यानें म्हणालीं, वत्सा, आम्हांशीं तूं बोलत कां रे नाहींस? असा खेद करूं नकोस. आम्हां दोघां आंधळ्यांस वाट

दाखविणारा तूं एकटाच उरला आहेस. धर्मराजाचें जें काय मागणें असेल तें देऊन त्याच्याशीं समेट कर; एवढेंच तुला आमचें शेवटचें सांगणें आहे.

दुर्योधनानें उसासे टाकून बाणेदारपणें उत्तर दिलें, माझे सर्व भ्राते व भीष्मद्रोणादि वीर मरण पावले. आतां या तुच्छ देहाच्या लोभानें मात्र मी पांडवांशीं लज्जास्पद संधि करूं काय ?

हें भाषण ऐकून गांधारी शोकाकुल होऊन स्वतःशीं उद्गारली, 'गे गांधारी, तूं जे शंभर वीरपुत्र प्रसविलीस, ते पुत्र नसून मूर्तिमंत शंभर दुःखेंच होत !'

या करुणोद्गारांनीं सर्वांच्या हृदयाचें पाणी झालें. कोणाच्याच मुखावाटे शब्द बाहेर येईना. तेव्हां क्षणभर दुःखाश्रु गिळून धृतराष्ट्रानें त्यांचें समाधान करीत म्हटलें, बाळा, दुर्योधना, युद्ध सुरू ठेवण्याचा तुझा निर्धारच असेल तर शत्रूचा प्रायः गुप्तपणानें घात होईल असा कांहीं तरी उपाय शोधून काढ.

दुर्योधन म्हणाला, बाबा, असे कसें होईल ? ज्यांनीं माझ्या बंधूंचा माझ्या डोळ्यांदेखत संहार केला त्यांच्यावर मी गुप्तपणें हल्ला करूं काय ? ही काय युद्धनीति !

इतक्यांत एक मोठा गलबला अकस्मात् सर्वजणांच्या कर्णरंध्रांवर आदळल्यामुळें दुर्योधनाचे भाषण तेथेंच थांबलें. गांधारी भयभीत होऊन थरथर कांपूं लागली. कर्णसारथी शल्य घाईघाईनें येऊन ओरडूं लागला कीं, 'घात झाला ! घात झाला ! दैव बुडालें !' हें ऐकतांच हृदयांत शल्य टोंचल्यासारखें होऊन सर्व लोक मूर्च्छित झाले. कारण तो कर्णाचा रथ रिकामा पाहून त्यांचे मनोरथ भग्न झाले.

'कर्णाच्या रथाचें चाक पृथ्वीनें गिळिलें असतां अर्जुनानें कर्णाचें डोकें उडविलें' ही वज्रपातासारखी दारुण वार्ता ऐकून दुर्योधनाची काय अवस्था झाली असेल !

'हा प्राणसख्या कर्णा, आतां माझें दुःख मी कोणाला सांगूं? तुझ्या-मागें हें लाजिरवाणें जीवित ठेवून काय करायचें?' असा दुर्योधन शोक करूं लागला. तथापि क्षणभरानें दुःखावेग आवरून त्यानें तारस्वरानें अशी घोषणा केली कीं, 'थांबा, ज्या दुष्टानें कर्णाचा घात केला त्याच्या नरडीचा घोट घेतों.'

धृतराष्ट्र म्हणाला, दुर्योधना, तुझ्या पदरीं मोठमोठे वीर आहेत त्यांतून कोणास तरी सैनापत्याचा अभिषेक कर. एवढें तरी माझें ऐक.

दुर्योधनानें उत्तर दिलें, आतां शल्य कशास व अश्वत्थामा कशास? या नेत्रजलाने मीं स्वतःसच अभिषेक करून घेतला आहे.

इकडे भीमार्जुन एका रथांत बसून दुर्योधनाचा शोध काढीत काढीत तेथें आल्याची सारथ्यानें वर्दी दिली. लगेच रथांतून खालीं उतरल्यावर अर्जुन धृतराष्ट्राजवळ जाऊन नम्रपणें म्हणाला, आपल्या पुत्रांची ज्याच्यावर सर्वस्वी मदार होती त्या गर्विष्ठ राधेयाचा वध करणारा हा अर्जुन आपलें पादवंदन करीत आहे.

नंतर भीमानें म्हटलें, ज्यानें दुःशासनाचें रक्त प्राशन केलें आहे व जो दुर्योधनाच्या मांडीचा चुराडा करणार आहे, तो हा भीम आपणांस वंदन करीत आहे.

हे भीमाचे उद्दामपणाचे उद्गार कानांवर पडतांच त्या म्हाता-ऱ्याच्या पायाची तिडिक मस्तकास गेली व तो म्हणाला, अरे दुष्टा वृकोदरा, कशाला एवढी प्रौढी मिरवतोस? क्षत्रिय असतात ते रणांग-णावर पराक्रम करून शत्रूस जिंकतात किंवा मरतात; तूं एवढी व्यर्थ बड-बड करून आम्हांस कां दुःख देतोस?

धृतराष्ट्राचें हें भाषण संपतें न संपतें तोंच 'हा मूर्खा वायुपुत्रा, होतास कीं नव्हतास असें तुला आतांच करून टाकतों' असें बोलून दुर्योधन भीमास मारावयास उठला. पण धृतराष्ट्रानें त्याचा हात धरून त्यास खालीं बसविलें. मिशांस पीळ देऊन भीमहि त्याच्या अंगावर

धावूं लागला. तेव्हां त्यास अर्जुनानें अडवून धरिलें; नाहींतर भारतीय युद्धाचा शेवट तेथेंच झाला असता ! पण दुर्योधनाची अद्याप घटका भरली नव्हती.

याच वेळीं युधिष्ठिरानें रणभूमीवर अशी घोषणा करविली कीं, 'अहो भीमसेन-अर्जुन हो, सूर्यास्त होण्यापूर्वीं आपापली सेना आवरून युद्ध तहकूब करा.'

त्याच्या आज्ञेनुसार भीमार्जुन युद्ध थांबवून तेथून निघून गेले.

दुसऱ्या बाजूनें अर्जुनास युद्धाचें आह्वान करीत अश्वत्थामा त्याचा शोध करीत तेथें आला. कर्णवधाचा वृत्तान्त ऐकून त्यानें पूर्वीं टाकून दिलेलें खड्ग पुनरपि सज्ज केलें होतें त्याची वीरश्रीची गर्जना ऐकून धृतराष्ट्रास हर्ष झाला व अश्वत्थाम्यास सामोरें जाऊन त्याचा सत्कार करण्यास त्याने दुर्योधनास सांगितलें.

दुर्योधनानें वरपांगी उत्थापन देऊन गुरुपुत्रास हातीं धरून खालीं बसविले. तथापि अश्वत्थाम्याविषयीं त्याचा क्रोधाग्नि प्रदीप्त होऊन तो त्यास रागानें व उपरोधिकपणे म्हणाला, आचार्यपुत्रा, थोडें थांब; कर्णाचा अंत होईपर्यंत हातीं शस्त्र धरावयाचें नाहीं, असा तुझा निर्धार होता; तो कर्ण आम्हांस सोडून गेलाच; आतां माझाहि शेवट होऊं दे; कारण कर्ण व दुर्योधन हे दोन नाहींत.

हें मर्मभेदक व खोंचदार भाषण ऐकून 'काय ! अद्यापि कर्णाविषयीं पक्षपात आणि माझा तिरस्कार ! बरें तर हा मी चाललों' असें उच्चस्वरानें बोलत बोलत द्रोणपुत्राची स्वारी पाय आपटीत आपटीत तेथून चालती झाली.

'वत्सा, अशा कटुभाषणानें पराक्रमी पुरुषास दुखविणें तुला योग्य नाहीं. अथवा तुजकडे तरी काय दोष आहे ? भरतकुलाचा अंतकाळ समीप आला आहे.' असे उद्गार काढीत धृतराष्ट्र गांधारीसह शल्याच्या डेऱ्याकडे जावयास निघाला.

दुर्योधनानें प्रभातकाळीं युद्धरथ सिद्ध करण्यास सूतास आज्ञा केली. पुनश्च युद्धास प्रारंभ झाला. कर्णाच्या मागून कौरवांचें सैनापत्य दुर्योधनानें शल्यास दिलें. प्रथम युधिष्ठिरानें शल्यास यमसदनास पाठविलें. जिकडेतिकडे हलकल्लोळ उडाला. सहदेवानें शकुनिप्रभृति गांधारदेशच्या राजांचा शेवट लावला. कृपाचार्य, कृतवर्मा व अश्वत्थामा समरभूमि सोडून निघून गेले. जिकडेतिकडे मृतवीरांचीं प्रेतें विखुरलीं गेलीं व त्यावर पक्षी यथेच्छ ताव मारूं लागले.

भीमाची दारुण प्रतिज्ञा ऐकून दुर्योधन कोणीकडे जाऊन लपून राहिला हें कोणासहि समजेना. त्याचा माग काढण्यास युधिष्ठिरानें अनेक कुशल लोक चहूंकडे पाठविले; व शोध लावणारास मोठें पारितोषिक मिळेल अशी दवंडीहि पिटवली.

कृष्णार्जुन व भीमसेन एका रथांत बसून दुर्योधनाचा तपास करीत फिरत असतां एक पुरुष धापा टाकीत येऊन सांगूं लागला कीं, ‘येथून जवळच एका सरोवराच्या तीरावर दोन मनुष्यांच्या पावलांच्या खुणा पाण्यांत गेलेल्या स्पष्ट दिसत आहेत. त्यांतून एक परत बाहेर निघालासा दिसतो; दुसरा मात्र बाहेर निघालेला दिसत नाहीं. यावरून काय असेल तें आपण पाहावें.’

असें त्या पुरुषाचें भाषण ऐकतांच ते तिघेजण त्यालाच पुढें करून मोठ्या गडबडीनें निघाले. अर्जुन दीर्घ व उष्ण निश्वास टाकूं लागला. भीम आपल्या विद्युल्लतेसारख्या नेत्रांनीं गदेकडे पाहात पाहात ती परजूं लागला.

सरोवरासमीप येतांच श्रीकृष्ण आपली मान हालवून भीमास म्हणाले, दुर्योधनास पाण्यांत बुडून राहण्याची विद्या अवगत आहे. या खुणा त्याच्याच पावलांच्या असल्या पाहिजेत. श्रीकृष्णाचें बोलणें पुरें होण्यापूर्वींच भीमसेन आपल्या वज्रतुल्य गदेनें सरोवराचें पाणी

ढवळूं लागला. त्या निनादानें दशदिशा भरून गेल्या! सर्व कमलांचा विध्वंस झाला! जलचर प्राणी मूर्च्छित झाले, व पक्षी भयानें दूर उडून गेले!

'अरे कौरवाधमा, युद्धभूमि सोडून असा चिखलांत काय दडून बसला आहेस?' अशी कानठळ्या बसविणारी भीमाची गर्जना चालली होती. क्षीरसागराचें मंथन करणाऱ्या देवाप्रमाणें तो शोधूं लागला. समुद्रांतून ज्याप्रमाणें कालकूट विष निघालें त्याप्रमाणें त्या सरोवरांतून दुर्योधन त्वेषानें बाहेर पडला; व दोहों हातांनीं गदा उगारून त्यास म्हणाला, अरे वायुपुत्रा, मी विश्रांति घेण्यासाठीं पाताळीं जाऊन बसलों होतों, तुझ्या भीतीनें नव्हे; समजलास मूर्खा?

नंतर पाण्यांत युद्ध करणें बरें नव्हे असें कृष्णार्जुनांनीं सांगितल्यावर दोघे वीर बाहेर मैदानांत आले व परस्परांचीं वर्मे काढून प्रथम वाग्युद्ध करूं लागले.

भीम म्हणाला, दुर्योधना, तुला तुल्यबल वाटणाऱ्या आम्हां पांडवांपैकीं तूं कोणाशींहि युद्ध कर. दुर्योधनाने उत्तर दिल, अरे तुम्ही दोघेहि माझे सारखेच शत्रू आहांत; परंतु सर्व पांडवांमध्यें तूंच साहसप्रिय असल्यानें तुझ्याशींच सामना करणें मला अत्यंत प्रिय आहे.

झालें! प्राणान्तिक गदायुद्ध सुरू झालें. दोघांच्या अंगांत मजबूत चिलखतें असून डोक्यावर मुकुट होते. दोघांचेहि डोळे क्रोधानें इंगळासारखे लाल व संतप्त झाले होते; एकाचे द्रौपदीच्या विटंबनेमुळें, तर दुसऱ्याचे भ्रातृवधामुळें. भीम शरिरानें प्रचंड आणि जड होता; दुर्योधन हलका व चपळ होता. दोघांस सारखेंच शिक्षण मिळालें होतें. तथापि लोखंडाचा भीम करून त्याजवर सतत तेरा वर्षें दुर्योधनानें गदायुद्धाचा अभ्यास केला होता.

परस्परांची सलामी होऊन थोडेसे पवित्रे झाल्यावर एकमेकांवर

गदेचे प्रहार करण्यास त्यांनीं सुरवात केली. दुर्योधनानें झपाट्यानें भीमाच्या मस्तकावर एक तडाखा हाणला. त्याबरोबर भीम त्वेषानें उसळला व त्यानें दुर्योधनाच्या मांडीवर असा कांहीं जोराचा प्रहार केला कीं, तो त्याच्या वेदनेनें धाडकन् खालीं पडला!

हें द्वंद्वयुद्ध चालू असतां कृष्णानें युधिष्ठिराकडे एक दूत पाठवून त्यास असें कळविलें कीं, 'दुर्योधन भीमाच्या कचाट्यांत सांपडला आहे, तेव्हां आतां भुवनतल निष्कंटक झालें असें समजून मंगल समारंभ सुरू करा'.

पण तितक्यांत चार्वाक नामक राक्षस, दुर्योधनाचा एक मित्र, ऋषीचा वेष घेऊन युधिष्ठिरद्रौपदींकडे जाऊन त्यांस असें सांगूं लागला कीं, 'भीम-दुर्योधनांचें गदायुद्ध पाहाण्यास बलराम आला असतां त्यानें आपला प्रियशिष्य दुर्योधन यास एक गुप्त उपाय सुचविला; त्यायोगे त्यानें भीमाची क्षणार्धांत चांदी उडविली! भीमानें देह टाकिलेला पाहातांच अर्जुनानें गांडीव धनुष्य टाकून रक्तानें भरलेली भीमाची गदा हातांत धरून दुर्योधनाबरोबर गदायुद्ध सुरू केलें. दुर्योधन अर्जुनापेक्षां गदायुद्धांत निपुण असल्यानें या युद्धांत अर्जुनाचें बरेंवाईट झाल्यास कृष्णास वाईट वाटेल म्हणून बलरामानें कृष्णास रथांत घालून द्वारकेस नेलें'.

हें अद्भुत पण दुःखद वृत्त खरें आहे असें समजून धर्मराज व पांचाली शोक करूं लागलीं. 'हाय, हाय! आमचें दैव फिरलें! आतां आम्हांस जगून काय करावयाचें आहे!' असे परिजनांसमोर दुःखोद्गार काढून काष्ठांच्या राशीची चिता पेटविण्यास त्यांस त्यांनीं आज्ञा केली.

त्याच क्षणीं दुर्योधन द्रौपदीचा शोध करीत समोरून येत आहे अशी धर्मराजास कंचुकीनें वर्दी दिली.

तेव्हां युधिष्ठिरानें म्हटलें, काय! तर मग या दुरात्म्यास मिठी

मारून अग्नींत ढकलून देतों म्हणजे झालें; असें म्हणून त्यानें त्या समोरून आलेल्या पुरुषास मिठी मारिली. त्याबरोबर तो पुरुष प्रेमळपणानें म्हणाला, दादा, मी दुर्योधन नसून त्याच्या रक्तांत स्नान केलेला भीम आहें. आपण मला ओळखलें नाहीं काय?

त्यावेळीं कंचुकी मध्येंच म्हणाला, महाराज, खरेंच! हे आपले भीमसेन. यांचे स्वरूप उग्र व अक्राळविक्राळ झाल्यामुळें मला ते ओळखूं आले नाहींत. चार्वाकाच्या भाषणावर विश्वास ठेवल्यानें मला ध्यानींमनीं दुर्योधन दिसूं लागला, व समोरून भीमसेन आले असतां, दुर्योधन आला अशी मीं आपणांस वर्दी दिली. महाराज, आपलीहि अशीच अवस्था होऊन आपणहि चुकलां.

धर्मानें भीमास न्याहाळून पाहिलें तेव्हां त्यास अत्यंत हर्ष होऊन त्याच्या जिवांत जीव आला. तो भीमास म्हणाला, वत्सा, माझे नेत्र पाण्यानें भरले असल्यामुळें तुझी मुद्रा मला दिसली नाहीं. तूं कृतार्थ झालास ना? अर्जुन खुशाल आहेना? इत्यादि कुशल प्रश्न विचारून धर्मानें पुनः त्यास दृढ आलिंगन दिलें. आणि भीमानें आपल्या लाल-भडक हातांनीं द्रौपदीची विसकटलेली वेणी बांधून आपली प्रतिज्ञा पूर्ण केली.

यक्षगंधर्व आणि इंद्रादि देव आकाशांतून या वेणीसंहार—महोत्स-वाचें अभिनंदन करूं लागले. व्यासवाल्मीकिप्रभृति महर्षि तेथें अकस्मात् प्रकट झाले व द्रौपदीधर्मराजांस सिंहासनाधिष्ठित करून त्यांनीं त्यांस मंगलाभिषेक केला. त्या वेळीं रणवाद्यांच्या ऐवजीं मंगल-वाद्यांचा जयघोष सुरू झाला.

---

# विशाखदत्तकृत—मुद्राराक्षस*

## पात्रें

- **चाणक्य**-चंद्रगुप्त राजाचा प्रधान.
- **राक्षस**-नंदाचा प्रधान.
- **चंद्रगुप्त**-पाटलिपुत्र नगराचा राजा.
- **मलयकेतु**-पर्वतक नांवाच्या राजाचा पुत्र.
- **सिद्धार्थक**-, **समिद्धार्थक**- } चाणक्याचे फितुरी; बाह्यतः राक्षसाचे सेवक म्हणविणारे.
- **भागुरायण**-चाणक्याचा फितुरी; बाहेरून मलयकेतूचा मित्र म्हणविणारा.
- **शकटदास**-, **चंदनदास**- } राक्षसाचे मित्र.
- **स्तुतिपाठक**- } चंद्रगुप्ताचे भाट; राक्षसाचे फितुरी.
- **वैरोचक**-पर्वतक राजाचा भाऊ.

### भाग १ ला

सुमारें दोनहजार वर्षांपूर्वींची गोष्ट. पाटलिपुत्र नांवाच्या नगरांत नंदघराण्यामध्यें महापद्म नंद नामक एक राजा होऊन गेला. बहार प्रांतांतील पाटणा शहराचें व पाटलिपुत्र हें प्राचीन नांव असावें असें तज्ज्ञांचें मत आहे. त्या राजास पट्टराण्यांपासून झालेले आठ व दासीपासून झालेला एक असे नऊ मुलगे होते. दासीपुत्राचें नांव चंद्रगुप्त होतें.

हा नंद राजा जरी बलाढ्य, पराक्रमी व दानशूर होता, तरी तो स्वभावानें अत्यंत निष्ठुर, जुलमी व अविचारी होता.

* मुद्रा किंवा आंगठी इच्या योगानें राक्षस नामक अमात्यास वश केल्याचें कथानक या नाटकांत असल्यानें त्यास 'मुद्राराक्षस' असें नाटककारानें नांव दिलें आहे.

एकदा चाणक्य म्हणून एक विद्वान्, तेजस्वी पण दरिद्री ब्राह्मण नंदराजाच्या निमंत्रणावरून राजवाड्यांत भोजनास गेला असतां प्रमुख स्थानीं जाऊन बसला. हा कोणी तरी यःकश्चित भोजनभाऊ भटजी असावा असें त्याच्या वेषावरून वाटून नंदानें त्यास तिरस्कारानें आसनावरून उठवून लाविलें. त्याची लांब शेंडी धरून त्याला ओढीत असतां हिसडाहिसडींत तिची गांठ सुटली; तेव्हां हा अपमान सहन न होऊन त्यानें संतापानें अशी प्रतिज्ञा केली कीं, 'या राजाचा व त्याच्या पुत्रांचा जेव्हां समूळ नाश करीन तेव्हांच मी आपल्या शेंडीला गांठ मारीन. तावत्कालपर्यंत माझी शेंडी पाठीवर कालसर्पिणीप्रमाणें लोंबत राहील.'

पुढें चंद्रगुप्तास हाताशीं धरून चाणक्यानें नंदवंशाचा नायनाट केला; व अशा रीतीनें आपली घोर प्रतिज्ञा शेवटास नेऊन त्यानें चंद्रगुप्तास गादीवर बसविलें.

या नंदराजाचे पदरीं राक्षस नांवाचा एक स्वामिभक्त व कर्तव्यनिष्ठ ब्राह्मण प्रधान होता. नंदांचा सर्वतोपरी नाश झालेला असतांनाहि नंदवंशावर त्याची निस्सीम व निरुपम भक्ति असल्यामुळें नष्ट झालेलें राज्य परत मिळविण्यासाठीं त्याने आटोकाट खटपट चालविली. राक्षसाच्या स्वामिनिष्ठेबद्दल चाणक्याच्या मनांत नितांत आदर वसत असे; म्हणून त्याला वश करून घेऊन चंद्रगुप्ताचें मंत्रिपद त्यास द्यावें व त्याच्या राज्यास त्यायोगें स्थैर्य व बळकटी आणावी व स्वतः राजकारणांतून मोकळें व्हावें असें चाणक्याच्या मनांत होतें.

तथापि राक्षस हा महाबुद्धिमान्, चतुर व कारस्थानी असल्यामुळें तो कांहीं सहजासहजीं वश होण्यासारखा नव्हता. यास्तव आपला हेतु तडीस नेण्यासाठीं चाणक्यास अनेक युक्त्या योजाव्या लागल्या.

नंद व त्याचे अनुयायी यांचा विध्वंस करण्याच्या कामीं उत्तर

हिंदुस्थानांतील पर्वतेश्वर ( अथवा पर्वतक ) नांवाच्या एका राजानें चाणक्यास मदत केली होती. तिचा मोबदला म्हणून त्यास नंद-राज्याचा कांहीं भाग देण्याचें त्यानें अभिवचन दिलें होतें. याच सुमारास चंद्रगुप्तावर विषप्रयोग करण्याकरितां राक्षसानें त्याजकडे एक सुंदर विषकन्या पाठविली, तिचा चाणक्यास सुगावा लागला. तेव्हां त्यानें ती पर्वतेश्वराकडे जाईल अशी युक्ति लढविली व मोठ्या शिताफीनें चंद्रगुप्तास ह्या प्रसंगांतून वाचविलें; व पर्वतेश्वराचा त्या कपटी स्त्रीकरवीं शेवट करविला. नंतर त्यानें अशी भूमका उठविली कीं, प्रतिपक्षाचें बल कमी करण्यासाठींच राक्षसानें चंद्रगुप्ताचा दोस्त पर्वतेश्वर यांस फसवून ठार मारविलें.

पुढें पर्वतेश्वराचा पुत्र मलयकेतु हा चाणक्याचा पक्ष सोडून गेला व पितृवधाचा सूड उगविण्याची संधि केव्हां येईल याची तो वाट पहात असतां, राक्षसानें त्याला नंदांचें सर्व राज्य चंद्रगुप्तापासून मिळवून देण्याचें आश्वासन दिलें आणि दोघांनीं मिळून चाणक्यावर स्वारी करण्याचा घाट घातला.

चाणक्याच्या ठिकाणीं दांडगा आत्मविश्वास असून त्याचा स्वभाव धिमा होता. कोणत्याहि संकटास तोंड देण्यास तो तयार असे. स्वतःच्या बुद्धिबलावर व हिंमतीवर त्याची सर्व मदार होती. तो म्हणे माझी बुद्धि मात्र न जावी;[१] बाकी कांहीं झालें तरी चालेल. तो दैववादी नव्हता. शत्रूच्या गोटांतील बित्तंबातमी काढण्यासाठीं व त्यांच्यामध्यें फूट पाडण्यासाठीं अनेक भाषा जाणणारे व घेतलेल्या सोंगाची उत्तम बतावणी करणारे गुप्त हेर त्यानें गांवोगांव पाठवून दिले व राक्षसाचे स्वतःचे मित्र कोण कोण आहेत, ते कोठें राहातात, काय करतात याचा तपास चालविला. मग त्यानें आपला एक बाळमित्र राक्षसाकडे पाठविला व राक्षसाची त्याच्याशीं मैत्री घडवून आणिली.

---

१ बुद्धिस्तु मा गान्मम ।

हा नवीन स्नेही राजनीतिशास्त्रांत निपुण असल्यामुळें राक्षसानें त्याला लवकरच विश्वासांत घेतलें. यापासून चाणक्यास हा फायदा झाला कीं, शत्रूकडील प्रत्येक हालचाल त्याला या मित्रामार्फत गुप्तपणें कळूं लागली.

स्वपक्षास बळकटी आणण्याकरितां चंद्रगुप्ताच्या उपयोगीं पडलेल्या सर्व सरदारांस मोठमोठ्या अधिकाराच्या जागा देऊन चाणक्यानें संतुष्ट केलें. पर्वतेश्वर मृत झाल्यावर त्याचा भाऊ वैरोचक यास चाणक्यानें जवळ बोलाविलें व राक्षसानें तुमच्या भावास कपटानें मारविलें व तुमचा पुतण्या मलयकेतु हा राक्षसास जाऊन मिळाला तेव्हां पर्वतेश्वरास देऊं केलेलें अर्धें राज्य तुम्हांसच देतों असें वचन देऊन वैरोचकास सर्वस्वीं आपलेंसें करून घेतलें. याचा इष्ट तो परिणाम झाला. पर्वतेश्वरास देऊं केलेला राज्याचा वाटा टाळण्यासाठींच चाणक्यानें मित्रद्रोह करून त्यास परलोकीं पाठविलें असा जो लोकप्रवाद उठला होता, त्यास आळा बसून चाणक्याच्या सद्धेतूबद्दल लोकांची खात्री झाली.

पुढें कांहीं दिवसांनीं चाणक्यानें चोंहोंकडे अशी बातमी उठविली कीं, आज मध्यरात्रीं ज्योतिष्यांनीं दिलेल्या मुहूर्तावर चंद्रगुप्त नंदांच्या वाड्यांत प्रवेश करणार आहे ही वार्ता ऐकून राक्षसाकडील दारुवर्मा नामक एका फितुरी शिल्पकारानें चित्रविचित्र तोरणें, सोनेरी कमानी, पताका वगैरे लावून नंदांच्या राजवाड्याचें महाद्वार शृंगारून ठेविलें. आपल्या आज्ञेची वाट न पाहतां ही सर्व तयारी झालेली पाहून चाणक्याच्या मनांत संशय उत्पन्न झाला; पण आपणांस मोठा संतोष झाल्याचें बाह्यतः दाखवून त्यानें दारुवर्म्याच्या दक्षतेची प्रशंसा केली व त्याबद्दल त्यास लवकरच योग्य बक्षीस मिळेल असें जाहीर केलें.

चंद्रगुप्ताच्यापूर्वीं वैरोचकास प्रथम राज्याभिषेक करण्याचें ठर-

वून त्यास चाणक्यानें चंद्रगुप्ताच्या हत्तिणीवर बसविलें; त्यास अंगांत सुंदर चिलखत घालण्यास देऊन त्याच्या मस्तकावर रत्नखचित मुकुट घातला; अशा थाटांत तो परिचित लोकांनाहि ओळखतां येणें कठीण होतें. वैरोचकास पाहून हा 'चंद्रगुप्त'च आहे असें दारुवर्मा कारागिरास व इतरांसहि वाटलें.

सर्व लव्याजम्यानिशीं मिरवणूक निघाली. ती वाड्याच्या द्वाराजवळ येतांच चंद्रगुप्ताच्या फितुरी माहुतानें वैरोचकास चंद्रगुप्त समजून त्याचा खून करण्याकरितां गुप्तीस हात घातला, तों हत्तिणीस वाटलें कीं, हा आपणांस मारूं पाहात आहे; म्हणून ती बिचकली व सैरावैरा धावूं लागली. वेळेचा अदमास चुकला आणि त्या दरवाज्याची कमान वैरोचकावर न पडतां माहुतावर पडून तो मात्र ठार झाला. आपलें कारस्थान फसलेंसें पाहून दारुवर्म्यानें यंत्र जोडण्याची एक मोठी लोखंडी खीळ नेम धरून फेंकली; ती वर्मीं लागून वैरोचक क्षणार्धांत मरून पडला. हें पाहतांच पुढें चालणारें पायदळ खवळलें व त्यानें त्या राक्षसपक्षाच्या दारुवर्मा शिल्पकारास दगडानें ठेचून यमसदनास पाठविलें.

अशा रीतीनें चंद्रगुप्ताच्या किंवा चाणक्याच्या पदरीं दोष न येतां, राज्याचा वाटेकरी जो वैरोचक त्याचा कांटा परस्पर निघाला.

आपला कपटप्रयोग आपल्याच अंगाशीं आलेला ऐकल्यावर, 'हर-हर! आमचा मित्र दारुवर्मा आम्हांस सोडून गेला ना! त्या दुष्ट चंद्रगुप्तास दैव अनुकूल आहे' असे उद्गार राक्षसाच्या तोंडून बाहेर पडले. तथापि निराश न होतां त्यानें दुसरा उपाय योजला. तो असा—

चंद्रगुप्त आजारी असल्याचें कळल्यावरून त्यानें औषधोपचार करण्याच्या मिषानें अभयदत्त नांवाच्या वैद्यास त्याजकडे पाठविलें. त्यानें राजास विषमिश्रित औषध तयार करून दिलें. चाणक्यानें आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें तें औषध परीक्षापूर्वक देण्याचें ठर-

विलें आणि एका सोन्याच्या पात्रांत त्यानें तें ओतलें. तेव्हां त्याचा रंग पालटलेला पाहून त्यानें तें त्या वैद्यासच पाजलें. औषध प्राशन करतांच वैद्यराज यमाजी भास्करास भेटावयास गेले.

येथेंहि राक्षसाचें कपटकृत्य त्याच्याच अंगावर शेकलें; तथापि एवढ्यावरच न थांबतां त्यानें आपले कपटप्रबंध तसेच पुढें चालू ठेविले.

चंद्रगुप्त निजला असतां त्यास मारावें या हेतूनें राजवाड्यांतल्या चोरखोल्यांत कांहीं लोक दडवून ठेवण्यांत आले होते. त्याच दिवशीं राजा महालांत निजावयास जाण्याच्यापूर्वीं त्याच्या जिवास कांहीं धोका आहे असा संशय आल्यावरून आर्य चाणक्यानें सर्व जागा न्याहाळून पाहिली. तेव्हां भिंतीच्या भेगेंतून धान्याचे कण तोंडांत धरून मुंग्यांची रांग चाललेली त्यास दिसली. त्यावरून आंत आसपास मनुष्याची वस्ती असावी असें त्याच्या डोक्यांत आलें. मग काय? त्यानें सर्व महालाला आग लावून दिली. अर्थातच आंत दडून बसलेले सर्व लोक जागच्या जागीं जळून खाक झाले!

याप्रमाणें राक्षसाच्या सर्व मसलती सपशेल फसल्या इतकेंच नव्हे तर त्यांचा सर्वांशीं त्याला प्रतिकूल असा परिणाम झाला!

पाटलिपुत्रामध्यें राक्षसाच्या बाजूचे जे लोक होते त्यांचा तलास लावून आर्य चाणक्यानें सर्वांस कडक शासन केलें. कोणास सुळीं दिलें, कोणास कैदेंत टाकलें तर कोणाची धिंड काढून त्यास हांकून लाविलें.

याच शहरांत चंदनदास नांवाचा एक जवाहिऱ्या राहात असे. राक्षसाचा तो जीव कीं प्राण होता. त्याच्याजवळ आपलीं बायकामुलें ठेवून राक्षस पाटलिपुत्र सोडून मलयकेतूच्या गांवीं जाऊन राहिला होता.

निपुणकनामक चाणक्याचा एक हेर चित्रपट दाखवीत घरोघर

हिंडत असतां बुद्ध्या चंदनदास शेटजींच्या घरीं गेला. तो आपल्या सोंगाची बतावणी इतकी बेमालुम करीत असे कीं, त्याच्या खऱ्या खऱ्या स्वरूपाची कोणास यत्किंचित्हि शंका येत नसे. शेटजीच्या दारापुढें तो चित्रें पसरून गाणीं गाऊं लागला. तोंच सुमारें चार पांच वर्षांचा एक गोजिरवाणा मुलगा घरांतून बाहेर आला. 'अगबाई, बाहेर कीं ग गेला' असें मोठ्यानें म्हणत एक स्त्री लगबगीनें बाहेर येऊन त्या पोरास दटावून आंत घेऊन गेली. पण ती देवडीवरून जात असतां त्या गडबडींत तिच्या बोटांतील आंगठी सैल असल्यामुळें तेथें गळून पडली. तेथून ती घरंगळत घरंगळत अगदीं नेमकी निपुणकाच्या पायाशीं येऊन थडकली. तिच्यावर कोरलेलें 'राक्षस' हें नांव दृष्टीस पडतांच त्यानें ती कोणास नकळत उचलून घेतली आणि खेळ संपल्यावर तावडतोब चाणक्याला नेऊन दिली व राक्षसाचें कुटुंब चंदनदासाच्या घरीं आहे तेथेंच ही सापडली इत्यादि हकीकत त्यास निवेदन केली.

आंगठी पाहून अर्थात् चाणक्यास पराकाष्ठेचा आनंद झाला. 'ओ हो! माझ्या हातीं केवळ मुद्रिका आली असें नाहीं तर आतां राक्षसच माझ्या हातांत आला म्हणावयाचा!' असें तो स्वतःशीं म्हणत असतां त्याचा चेहरा अधिकच प्रफुल्लित झाला.

त्यानें तत्काळ चंदनदासास बोलावून आणून त्यास अशी धमकी दिली कीं, 'शेटजी, बऱ्या बोलानें राक्षसाची मंडळी ताबडतोब सरकारच्या स्वाधीन करा, नाहीं तर फुकट प्राणास मुकाल. यावर शेटजीनें निर्भयपणें उत्तर दिलें, भटजी, इतकं भय कुणास घालतां? राक्षसाचीं मुलेंमाणसें माझ्या घरीं असतीं तरीसुद्धां मी तीं स्वाधीन करण्यास केव्हांहि तयार होणार नाहीं. मग नसतांना कोठून आणूं?

हें उत्तर ऐकून चाणक्यानें 'याला मुलांमाणसांसुद्धां बंदींत ठेवा'

असा रागारागानें हुकूम सोडला. मित्रकार्याकरितां आपणास कारागृहवासाचें दुःख सोसावें लागत आहे, स्वतःच्या दोषामुळें नव्हे ह्या विचारानें चंदनदासास समाधानच वाटलें.

याच सुमारास आर्यचाणक्यानें एक फारच अजब क्लृप्ति लढविली. ती अशीः—शकटदास नांवाचा राक्षसाचा एक कारकून मित्र होता. त्यास पुष्कळ पैसे चारून शत्रुपक्षांत फितुरी करण्याकरितां राक्षसानें ठेविलें होतें. चंद्रगुप्ताचा घात करण्याच्या कटांत तो सामील असल्याच्या संशयावरून चाणक्यानें त्यास सुळीं देण्याचा हुकूम केला; व इकडे तर सिद्धार्थक नांवाच्या गुप्त हेरास पुढील कानमंत्र सांगितलाः—'सिद्धार्थका, तूं शकटदासास ज्या स्थळीं सुळीं द्यावयाचें त्या स्थळीं जा आणि संतापानें डोळे वटारून मारेकऱ्याकडे पाहा; ते तुझा नेत्रसंकेत ओळखून भयचकित होऊन इतस्ततः पळून जातील. नंतर तूं शकटदासाची सुटका करून राक्षसाकडे त्यास त्वरेनें घेऊन जा. मित्राचा जीव वांचविल्यानें अमात्य राक्षस खूष होऊन तुला भलें मोटें बक्षीस देईल.' इतकें सांगून चाणक्यानें त्याच्यापाशीं मोहोर केलेला लखोटा व मोहोर असलेली आंगठी दिली. ह्याच मोहोरबंद लखोट्यानें राक्षस कसा नामोहरम झाला हें पुढील वृत्तान्तावरून लक्षांत येईल.

सिद्धार्थकानें चाणक्याच्या आज्ञेनुसार शकटदासास सोडवून आणिलें. त्यास पाहतांच राक्षसास अतिशय हर्ष होऊन तो आपल्या परमप्रिय मित्रास कडकडून भेटला व सिद्धार्थकास त्यानें आपल्या अंगावरचीं भूषणें बक्षीस दिलीं. त्यांचा स्वीकार करून सिद्धार्थक राक्षसास अदबीनें म्हणाला, महाराज, आपण कृपा करून दिलेलीं भूषणें तूर्त आपल्याच जामदारखान्यांत ठेवतों. कारण माझ्या परि-

---

१ दिष्ट्या मित्रकार्येण मे विनाशः, न पुरुषदोषेण ।

चयाचे येथें कोणी नाहींत. आपणांकडे ते सुरक्षित राहतील; मला लागतील तेव्हां मी घेऊन जाईन; त्यांवर या आंगठीनें मोहोर करतों म्हणजे झालें. मग तो मोहोर करीत असतां शकटदासाचें सहज तिकडे लक्ष जाऊन त्यावरील राक्षसाचें नांव त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां तो सिद्धार्थकास म्हणाला, मित्रा, या आंगठीवर अमात्य राक्षसाचें नांव कोरलेलें आहे, म्हणून ती तूं त्यांना दे. तिच्या मोबदला महाराज तुला पुष्कळसें द्रव्य देतील.

'हा माझ्यावर मोठा अनुग्रह होत आहे' असें बोलून सिद्धार्थकानें ती आंगठी अमात्य राक्षसापुढें ठेविली. राक्षसानें आश्चर्यानें तिच्याकडे पाहून विचारलें, अरे, ही तुझ्या हातीं कशीरे आली ?

पाटलिपुत्रामध्यें फिरतां फिरतां चंदनदासाच्या घराजवळ ही आंगठी आपणांस सांपडली इत्यादि वृत्तान्त त्यानें निवेदन करून ती मुद्रिका राक्षसाच्या स्वाधीन केली. राक्षस मनांत काय तें समजला व सिद्धार्थकावर त्याचा पूर्ण विश्वास बसला आणि त्याच्या इच्छेवरून राक्षसानें त्यास आपल्या घरीं नोकरीस ठेवून घेतलें. सिद्धार्थक बाजूस गेल्यावर शकटदासाकडे वळून राक्षस म्हणाला, शकटदासा, सरकारी कामकाजांत तूं याच मुद्रिकेची मोहोर करीत जा.

---

## भाग दुसरा

शरदृतूचे दिवस ! नंदकुलविनाशामुळें उदास व उद्विग्न झालेल्या प्रजेस दुःखाचा विसर पडून क्षणभर विरंगुळा वाटावा आणि दोन चार दिवस त्यांनीं आनंदांत व मजेंत घालवावेत या हेतूनें चंद्रगुप्तानें चंद्रिका-महोत्सव करण्याचें ठरविलें आणि पाटलिपुत्रांतील लोकांनीं गुढ्या-

तोरणें उभारून चंद्रिकोत्सव साजरा करावा अशी त्यानें सर्वांस आज्ञा केली.

दुसऱ्या दिवशीं राजा प्रासादावरील गच्चीवर चढून पाहतो तों काय ! गुढया कोठल्या व तोरणें कोठलीं ! नगर शृंगारलेलें दिसण्या-ऐवजीं त्यास सर्वत्र शुकशुकाट दृष्टीस पडला.

'काय ? प्रजाजनांनीं आमची आज्ञा मोडली ? मला कोणीच जुमानीत नाहीं ? हें आहे तरी काय ?' असें संतप्त होऊन त्यानें कंचुकीस विचारलें. त्यावर तो म्हणाला, महाराज, आर्यचाणक्यानें चंद्रिकोत्सवास मनाई केली आहे तेव्हां लोकांनीं काय करावें ?

नंतर चंद्रगुप्तानें चाणक्यास बोलावून आणून विचारलें, आर्या, चंद्रिकोत्सव बंद करण्याचें काय प्रयोजन ?

चाणक्य म्हणाला, राजा, आम्ही जें जें करतों तें तें हेतुपुरःसरच असतें. राज्यकारभाराची जबाबदारी सर्वस्वीं आमच्या शिरावर आहे. तूं खुशाल सुखोपभोग घे म्हणजे झालें. तुला नसती उठाठेव कशाला ? हें उत्तर ऐकून राजा अत्यंत क्षुब्ध झाला. ही संधि साधून राक्षसानें मुद्दाम पाठविलेले स्तुतिपाठक बाहेर उच्चस्वरानें चंद्रगुप्ताची स्तुति करूं लागले:—' हे नरश्रेष्ठा, मानी सिंहाला आपला दंतभंग कधींहि सहन होत नाहीं; तशीच मानधन राजांचीहि गोष्ट आहे. तुझ्यासारख्या सार्वभौम राजांना आज्ञाभंग कसा सहन होणार ?'

राक्षसानें पाठविलेल्या भाटांचीं प्रोत्साहक कवनें ऐकून राजा संतुष्ट झाला व त्या भाटांस सहस्र मोहरा बक्षीस देण्याची त्यानें सेवकांस आज्ञा केली. तीं ऐकून चाणक्यानें रुष्ट होऊन राजास आवेशानें म्हटलें, काय हा पैशाचा दुरुपयोग ! राजा, भलत्याच वेळीं ही उधळपट्टी करतोस हें काय ? हे मौज करण्याचे दिवस नाहींत. राक्षसाच्या चिथावणीवरून मलयकेतु आपणांवर चाल करून

येण्याचा बेत करीत आहे असें एकतों. अशा वेळीं तुला हे चाळे कसे सुचतात ?

आतां मात्र चंद्रगुप्ताचें पित्त भडकलें; त्याच्या अंगाची लाही लाही झाली; तो क्रोधानें लाल होऊन म्हणाला, हें काय ? तुम्ही जेथें तेथें मला असा प्रतिबंध करतां ! हें राज्य कसलें ? हा निव्वळ तुरुंगवास आहे ! त्यावर चाणक्यानें तितक्याच उच्चस्वरानें उत्तर दिलें, वृषला, तुला माझा प्रतिबंध सहन होत नसेल, तर खुशाल आपलें काम आपणच पाहात जा. पराधीन राजाची स्थिति अशीच असावयाची. आम्हांहून राक्षस तुला चांगला वाटत असेल तर आमचें मंत्रिपद त्यासच दे. असें म्हणून राजापुढें शस्त्र टाकून जमिनीवर पाय आदळीत चाणक्य चालता झाला.

राजा अगोदरच खवळला होता व या उत्तरप्रत्युत्तरानें आगींत तेल ओतल्याप्रमाणें झालें; तेव्हां त्यानें रागाच्या भरांत चाणक्यास प्रधानपदावरून दूर केल्याचें जाहीर करून सर्व कारभार तो स्वतःच पाहूं लागला.

ही बातमी राक्षसाच्या कानावर जातांच त्याच्या आनंदास पारावार उरला नाहीं. चंद्रगुप्तास चाणक्याविरुद्ध कांहीं तरी उपायांनीं चिथावण्याकरितां स्तुतिपाठकांचे वेष देऊन गुप्त हेरांची त्यानें जी योजना केली होती, तिचा इष्ट परिणाम झालेला पाहून त्यास कां बरें हर्ष न व्हावा ? चाणक्याचा कांटा आपल्या मार्गांतून आतां दूर झाला; आतां असहाय झालेल्या चंद्रगुप्तावर हल्ला करण्यास ही योग्य संधि आहे; आतां चंद्रगुप्तास तेव्हांच धुळीस मिळवूं असे तो मनांत मांडे खाऊं लागला.

बिचाऱ्या राक्षसास काय कल्पना कीं, चाणक्य आपल्या बारशास जेवला होता म्हणून ! ते भाट राक्षसाचे हस्तक आहेत ही गोष्ट चाणक्याच्या तेव्हांच ध्यानांत आली होती व चाणक्य-

चंद्रगुप्तांचा जो कलह झाला तो खरा नसून लटका होता. चाणक्याच्याच प्रेरणेवरून व दोघांच्या संमतीनें हें लटकें भांडण राक्षसाच्या डोळ्यांत धूळ टाकण्यासाठीं मुद्दाम घडवून आणण्यांत आलें होतें.

मध्यंतरीं भागुरायणनामक चाणक्याचा हस्तक मलयकेतूकडे जाऊन राक्षसाविरुद्ध त्याचें मन कलुषित करण्याचा प्रयत्न करीत होता. तो मलयकेतूस म्हणे, 'राक्षसाची नंदकुलावर अतिशय भक्ति आहे आणि चंद्रगुप्तहि त्याच वंशांतला. राक्षसाचें वैर काय तें येऊनजाऊन चाणक्याशीं. पुढें मागें चंद्रगुप्तास चाणक्याचा वरचष्मा सहन होणार नाहीं; तेव्हां तो कांहीं तरी निमित्त काढून त्यास प्रधानपदावरून काढून टाकून कुलपरंपरागत अमात्य जो राक्षस त्याच्याशीं सख्य करील. मग आपलें कसें होणार ?'

मलयकेतूस हें सर्व भाषण अगदीं खरें वाटूं लागलें. त्यास संशयपिशाच्चानें पछाडलें. भागुरायण पडला त्याच्या अत्यंत विश्वासांतला. शिवाय आपल्या पित्यास परलोकास जाऊन दहा महिने झाले तरी आपण अद्याप शत्रूचा सूड उगविला नाहीं ही गोष्टहि त्याच्या मनास एकसारखी खात असे.

पुढें कांहीं दिवसांनीं तो भागुरायणास घेऊन राक्षसाकडे गेला असतां त्यानें राक्षसाचें आपल्या हेराशीं झालेलें पुढील भाषण आडून ऐकलें.

राक्षस शकटदासास म्हणाला, मित्रा शकटदासा, आतां मात्र चंद्रगुप्त माझ्या कह्यांत आला म्हणून समज.

मलयकेतूनें या वाक्याचा अर्थ आपल्या समजुतीस अनुकूल असाच केला. तेव्हां त्याचें मन फारच अस्वस्थ होऊन तो गोंधळून गेला. आतां इतःपर राक्षसावर विश्वास ठेवावा कीं त्यास कट्टा वैरी समजून

त्याजपासून चार पावलें दूर राहावें याचा त्यास उलगडा होईना. कुंभाराच्या चाकाप्रमाणें त्याचें मन भ्रमण पावूं लागलें.

मनुष्याच्या मनांत एकदां विकल्प येऊं लागले म्हणजे ते कोणत्या थरास जातील याचा कांहीं नियम नाहीं. आपले वडील पर्वतेश्वर यांचा वध राक्षसानें कपटानें केला असावा, चाणक्यानें नव्हे असेंहि त्याच्या कानावर त्याच वेळीं आलें. मग काय विचारतां ! तो दांत-ओंठ खाऊन राक्षसास मारण्यास प्रवृत्त झाला. पण राक्षसास मारावयाचें नाहीं एवढेंच नव्हे, तर कोणत्याहि तऱ्हेनें त्याचा जीव धोक्यांत घालावयाचा नाहीं अशी चाणक्याची हेरांस ताकीद असल्यामुळें भागुरायणानें मलयकेतूस त्या घोर कर्मापासून परावृत्त केलें. तो त्यास म्हणाला, राज्य हस्तगत करण्यापूर्वीं राक्षसाचा वध करणें अदूरदर्शीपणाचें होईल. तोंपर्यंत त्याच्याशीं गोडीगुलाबीनेंच वागणें इष्ट आहे. मलयकेतूस हा युक्तिवाद पटला.

या वेळीं राक्षस व मलयकेतु यांच्या फौजेची छावणी पाटलिपुत्रालगत येऊनं पडली होती. छावणींतून कोणासहि बाहेर जावयाचें असेल तर परवान्याशिवाय जातां येत नसे. परंतु हा नियम धाब्यावर बसवून सिद्धार्थक प्रवासास निघण्याच्या तयारीनें एक लखोटा हातांत घेऊन छावणींतून बाहेर पडला, म्हणून त्यास पकडून परवाना नसल्याच्या आरोपावरून मलयकेतूच्या पुढें नेऊन उभें करण्यांत आलें. मलयकेतूनें प्रथम त्याच्या हातांतील लखोटा काढून घेतला आणि त्यावरील राक्षसाची मोहोर कायम ठेवून आंतील पत्र वाचलें. त्यांत 'ज्यांनीं साहाय्य करण्याचें कबूल केलें आहे त्या मित्रांस देऊं केलेल्या देणग्या देऊन संतुष्ट करावें. विशेष मजकूर हा विश्वासू नोकर तोंडीं सांगेल' इत्यादि मोघम भाषेंत लिहिलेला मजकूर वाचून त्यास आश्चर्य वाटलें.

हें पत्र कोणाचें बरें असावें, हा पत्र नेणारा होता तरी कोण हें

सर्व आतां चाणाक्ष वाचकांच्या ध्यानांत आलें असेलच. चाणक्याच्या सांगण्यावरून सिद्धार्थकानें हें पत्र शकटदासाकरवीं पाटलिपुत्रांत लिहविलें होतें. अर्थात् हें चाणक्यानें लिहावयास सांगितलें आहे असें शकटदासास सिद्धार्थकानें यत्किंचितहि कळूं दिलें नाहीं. त्यांतील मजकूर सांकेतिक भाषेंत असल्यामुळें शकटदासास त्याचा अर्थ उमगला नाहीं. पत्रांत नांव, गांव, मिती व सही हें कांहीं नव्हतें; वरती पत्ताहि नव्हता. राक्षसाच्या नांवाच्या आंगठीनें त्याच्यावर मोहोर मात्र केलेली होती. ती आंगठी चंदनदासाच्या घराजवळ निपुणकास सांपडली होती आणि ती त्यानें आर्यचाणक्यास नेऊन दिली होती. तिचीच मोहर त्यानें पत्रावर करविली होती.

मलयकेतूनें पत्र नेणाऱ्या माणसास म्हणजे सिद्धार्थकास खरपूस चोप दिल्यावर त्यानें कबूल केलें कीं, 'मी अमात्य राक्षसाचा सेवक असून चंद्रगुप्ताकडे त्याचें पत्र घेऊन जात आहें. कार्य निकडीचें असल्यानें मला परवाना घेण्यास वेळ झाला नाहीं. चंद्रगुप्तास तोंडीं मजकूर सांगावयाचा तो असा:— 'चंद्रगुप्ता, मलयकेतूचे स्नेही योग्य बक्षीस मिळाल्यास तुला येऊन मिळणार आहेत. कांहीं त्याच्या राज्याची इच्छा करीत आहेत, तर कांहीं त्याच्या खजिन्याची. तरी त्यांस संतुष्ट करावें. येन केन प्रकारेण चाणक्यास मंत्रिपदावरून दूर करून प्रजेच्या मनांत प्रेम व विश्वास उत्पन्न करावा.' वाचकहो, चाणक्यानें लखोटा देतांना सिद्धार्थकास कानमंत्र दिला तो हाच.

पूर्वींच भागुरायणानें मलयकेतूच्या मनांत राक्षसाविषयीं संशयाचें बीजारोपण केलें होतें. वरील गोष्टीचें त्यावर जलसिंचन झाल्यावर त्याचा हळूहळू वृक्ष बनत चालला.

मलयकेतु आश्चर्यानें स्वतःशीं म्हणाला, काय! माझे स्नेहीदेखील माझा विश्वासघात करून चाणक्यास मिळूं पाहात आहेत? शिवशिव!

नंतर त्यानें क्षणाचाहि विलंब न लावतां राक्षसास बोलावून

आणून त्यास पत्र दाखविलें. हा सर्व प्रकार राक्षसाच्या ध्यानींमनीं-देखील नव्हता. पत्र पाहतांच तो शांतपणें म्हणाला, हा लेख आमचा नाहीं. आम्हीं सिद्धार्थकास कांहींच काम सांगितलें नव्हतें. हें सारें शत्रूचें कुटिल कारस्थान.

'काय कुटिल कारस्थान! बरं ही मोहोर कोणाची?' मलयकेतूनें मध्येंच विचारलें.

आतां राक्षस काय उत्तर देणार? त्याच्या लेखकाचें म्हणजे शकटदासाचें तें अक्षर व लखोट्यावर त्याची स्वतःची मोहोर. राक्षस ती नाकबूल कशी करणार? ती न्याहाळून पाहतांच त्यास अत्यंत विस्मय वाटून हें सर्व प्रकरण आपल्याच गळयांत येत आहेसें त्यास वाटलें. त्या वेळीं बोलावयास त्यास तोंडच राहिलें नाहीं. बिचारा मूग गिळून हातावर डोकें टेकून खालीं पाहात बसला. काय करणार! त्याच्या मनांत मात्र असें येत होतें कीं, मलयकेतु विवेकभ्रष्ट झाला आहे. बरोबरच आहे. दैवानें ज्याला सोडलें त्याला सत्यासत्यविवेक कोठून राहणार[1]?

राक्षस गांगरून जाऊन कांहींच उत्तर देत नाहींसें पाहून त्याच्या विश्वासघातकी वर्तनाविषयीं मलयकेतूची पक्की खात्री झाली व तो संतापानें दांतओंठ खात म्हणाला, राक्षसा, दुष्टा, अनार्या, तुझ्यावर विश्वास ठेवून स्वस्थ बसणाऱ्यांचा तूं घात करूं पाहातोस काय? जा, कृतघ्ना, खुशाल चंद्रगुप्ताचा आश्रय कर; मी तुला सोडून देतों. मी विश्वासघातकी कृतघ्न राक्षस नव्हे. असें म्हणून मलयकेतु परिजनांसह तत्काळ निघून गेला.

नंतर त्यानें चंद्रगुप्ताचें हित इच्छिणारे व आपला घात करण्यास टपलेले असे चित्रवर्मादि राजे यांना जिवंत पुरून टाकिलें. पण याचा अनिष्ट व विपरीत परिणाम असा झाला कीं, 'हा मलयकेतु

१ दैवेनोपहतस्य बुद्धिरथवा पूर्वं विपर्यस्यति ।



**मलयकेतु**—राक्षसा, ही मोंहोर कोणाची ? (पृ. ९२ )

दुष्ट व अविचारी आहे' असें समजून त्याच्या मदतीस आलेले इतर राजे त्यास सोडून आपापल्या देशीं चालते झाले. सिद्धार्थकानें पाटलिपुत्रास जाऊन ही सर्व हकीकत चाणक्य व चंद्रगुप्त यांस निवेदन केली. चाणक्यानें ही सुवर्णसंधि साधून मलयकेतूला सोडून गेलेल्या त्या सर्व राजांशीं संधि केला आणि भागुरायणप्रभृति लोकांनीं मलयकेतूस धरून कैद केलें.

नंतर हा विजय मिळविल्याबद्दल चंद्रगुप्तानें चाणक्यास पूर्ववत् प्रधानपदावर स्थापित केल्याचें जाहीर केलें.

राक्षसाचें पुढें काय झालें? मलयकेतूची छावणी सोडून तो गेला तरी कोठें? ह्या प्रश्नाचें उत्तर हें कीं, त्याला आतां कोणाचाच आधार राहिला नाहीं; त्याचा स्वभाव किंचित् भोळा व अगदीं मोकळा असल्याचा हा परिणाम! आपल्या पक्षास मिळणाऱ्या लोकांची तो फारशी चौकशी करीत नसे. कोणावरहि त्याचा तत्काल विश्वास बसे. तसेंच कोणाबद्दल मनांत विकल्प येण्यास त्यास उशीर लागत नसे. त्यामुळेंच त्याच्यावर हा प्रसंग ओढवला. एवढें मात्र खरें कीं, तो स्वतःच्या अदूरदर्शित्वाबद्दल दैवासच दोष देत असे. अस्तु.

सर्वस्वीं हताश होऊन अमात्य राक्षस पाटलिपुत्राजवळील एका जीर्ण उद्यानांत जाऊन बसला. चाणक्याचे गुप्त हेर त्याच्या पाठोपाठ होतेच. मनुष्यास उच्चनीच दशा केव्हां येतील याचा कांहीं नियम नाहीं[१]. अपयश आलें तरी आपण कधींहि शत्रूच्या स्वाधीन होणार नाहीं अशा प्रकारच्या विचारांनीं राक्षसाच्या डोक्यांत काहूर केलें होतें. तरी आपला मित्र चंदनदास याच्याकडील कांहीं वर्तमान कोणाकडून कळलें तर पाहावें म्हणून तो इकडे तिकडे हिंडत असतां, एक गृहस्थ गळ्याभोंवतीं फास लावून

१ अलक्षितनिपाताः पुरुषाणां समविषमदशापरिणतयो भवन्ति ।

घेत असतांना त्यास दिसला. हा गृहस्थ चाणक्याचा हेरच होता. 'अरे बाबा, तूं कां प्राण देत आहेस? मी तुझ्यासारखाच दुःखी आहें' असें राक्षसानें त्या माणसास म्हटल्यावर त्यानें उत्तर दिलें, चंदनदासानें मित्रप्रेमास्तव राक्षसाचीं मुलेंमाणसें चंद्रगुप्ताच्या स्वाधीन करण्याचें साफ नाकारलें. त्यामुळें त्यास फाशीं देण्याचा हुकूम झाला. चंदनदासाकरितां त्याचा मित्र विष्णुदास यानें आपलें सर्वस्व देऊन मित्रप्राण वांचविण्याचा प्रयत्न केला खरा, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. त्यामुळें वैतागून तो अग्निप्रवेश करण्याकरितां नगरांतून बाहेर निघाला आहे. विष्णुदास म्हणजे माझा जीवश्चकंठश्च स्नेही; तेव्हां त्याचें बरेंवाईट कळण्यापूर्वींच मी आत्महत्या करून घेत आहें.

हें उज्ज्वल मित्रप्रेम पाहून व चंदनदास सुळीं जाणार हें ऐकून चंदनदासासाठीं राक्षसाचें प्रेमळ हृदय कळवळलें. तो म्हणाला, हाय! हाय! माझ्या प्रिय मित्राची अशी स्थिति व्हावी काय? आणि ती माझ्यामुळें? शाबास! मित्रा चंदनदासा, शाबास! धन्य तुझी! तूं मित्रस्नेह खरा करून दाखविलास! मी मात्र मित्राच्या विनाशास कारण झालेला केवळ नांवाचा 'राक्षस' नसून खराखुरा 'राक्षस' आहें, धिक्कार असो मला! मग तो त्या गृहस्थास म्हणाला, अरे भल्या गृहस्था, विष्णुदासास जाऊन सांग कीं, तुझ्याप्रमाणें राक्षसदेखील चंदनदासास मृत्युमुखांतून सोडविण्यास तयार आहे.

कांहीं वेळानें जवळच्या रस्त्यानें चंदनदासास सुळीं देण्याकरितां दोघे चांडाळ वधस्थानीं घेऊन चाललेले राक्षसाच्या दृष्टीस पडले. त्याच्या गळ्यांत रक्तपुष्पांच्या माळा असून अंगावर तांबडीं वस्त्रें होतीं. हा सर्व हृदयविदारक देखावा पाहातांच राक्षस उच्चस्वरानें व निराशेनें म्हणाला, अरे बाबांनो, नकारे, त्याचा जीव घेऊं नका! तो अगदीं निरपराधी आहे. त्याच्या गळ्यांतली माळ काढून ती

माझ्या गळ्यांत घाला. अरे, जा, अगोदर हें वर्तमान त्या दुष्ट चाणक्यास जाऊन सांगा.

हें सर्व संभाषण चाणक्य झाडाच्या आडून ऐकतच होता. राक्षसाचें औदार्य व दिव्य मित्रप्रेम अवलोकून चाणक्य थक्क झाला. तो पुढें सरसावून म्हणाला, अमात्य राक्षसा, हा विष्णुगुप्त आपणांस वंदन करीत आहे. हे चांडाळ नव्हेत. हे वेषधारी सिद्धार्थक व समिद्धार्थक होत. यांना आपण पूर्वीं पाहिलेलेंच आहे. तो कपट-लेख मींच शकटदासास न कळत त्याच्याकडून लिहवून घेतला होता. चंद्रगुप्त राजाचें आपणांशीं सख्य जुळविण्याकरितांच मीं हें राजकारण लढविलें. हा पाहा चंद्रगुप्त आपल्या भेटीस आला आहे. याच्या पित्याच्या वेळेस आपण अमात्यांत मुख्य होतां. चाणक्याचें भाषण ऐकून राक्षस स्तिमित झाला. हा कोण दुरात्मा आहे कीं महात्मा आहे असें तो मनांत म्हणाला. नंतर 'काय उपाय ? भेटलेंच पाहिजे !' असें राक्षस म्हणत आहे तोंच चंद्रगुप्तानें पुढें होऊन त्यास प्रणाम केला. राक्षसानेंहि त्याचा जयजकार केला.

मग चाणक्यानें राक्षसास म्हटलें, अमात्या, चंदनदासाचे प्राण वांचवावे अशी आपली वास्तविक मनीषा असल्यास हें शस्त्र हातांत घेऊन चंद्रगुप्ताची प्रधानकी स्वीकारावी.

राक्षसास मोठा पेंच पडला. 'काय करावें ! मित्रस्नेहास नमस्कार असो,[१] हा मी शस्त्र घेण्यास सज्ज आहें' असें मोठ्या निरुपायानें बोलून त्यानें प्रधानपदाचा स्वीकार केला. हें पाहून सर्वांस अत्यंत हर्ष झाला. व चंद्रगुप्ताचे सर्व मनोरथ पूर्ण झाल्याबद्दल चाणक्यानें त्याचें अभिनंदन केलें.

प्रधानपदाचा अंगिकार केल्यानंतर राक्षसानें चंद्रगुप्ताच्या संमतीनें

---

१ नमः सर्वकार्यप्रतिपत्तिहेतवे सुहृत्स्नेहाय ।

पहिली आनंदाची गोष्ट केली ती ही कीं, त्यानें मलयकेतूस बंधमुक्त करून त्यास त्याच्या पित्याचें राज्य दिलें आणि चंदनदासास सर्व राज्यांतील नगरशेटांत प्रमुख स्थान दिल्याचें जाहीर केलें.

चाणक्यानें आपली प्रतिज्ञा पूर्ण झाली म्हणून आपल्या शेंडीस गांठ दिली आणि चंद्रगुप्ताला व राक्षसाला विचारलें, तुमचे आणखी कोणतें प्रिय करावें सांगा. यावर राक्षसानें उत्तर दिलें,

चंद्रगुप्तराजा पृथ्वीवर सुखानें चिरकाल राज्य करो. यापेक्षां मला तरी दुसरी काय इच्छा राहिली आहे?



# भवभूतिकृत उत्तररामचरित*

## पात्रें

राम-अयोध्येचा राजा.
जनक-विदेह देशाचा राजा, रामाचा सासरा.
लक्ष्मण-रामाचा धाकटा भाऊ.
कुश } —रामाचे जुळे पुत्र
लव }
चंद्रकेतु-लक्ष्मणाचा पुत्र.
वसिष्ठ-रामाचे कुलगुरु.
तमसा-एक नदी.
वाल्मीकि-रामायणाचा कर्ता. कुशलवांचा पालनकर्ता.
अष्टावक्र-एक ब्राह्मणदूत.
दुर्मुख-रामाचा गुप्त हेर.
शंबूक-जनस्थानांतील शूद्र तपस्वी.
सीता-रामाची पत्नी.
कौशल्य-रामाची माता.
अरुंधती-वसिष्ठाची भार्या.
वासंती-वनदेवता, सीतेची मैत्रीण.

### भाग १ ला.

रावणाचा वध करून राम अयोध्येस परत आल्यावर त्यास राज्याभिषेक करण्यांत आला. त्यानंतर कांहीं काळ लोटल्यावर रामाचे मेहुणे ऋष्यशृंग यांनीं सोमयाग आरंभिला. त्यांनीं बोलावल्यावरून रामाच्या तिघी माता आणि कुलगुरु वसिष्ठ व अरुंधती त्यांच्या आश्रमीं गेलीं. राम व सीता यांना भेटण्यासाठीं आलेला जनकराजा अयोध्येस कित्येक दिवस राहिला होता तोहि मिथिलेस परत गेला; त्यामुळें सीतेस स्वाभाविकपणें फार वाईट वांटलें. तेव्हां तिचें सांत्वन करण्याकरितां राम सीतेच्या मंदिरांत गेला असतां अष्टावक्र-

* उत्तर म्हणजे पुढचें; रामचरित्राच्या उत्तरार्धाचें वर्णन ह्या नाटकांत केलें असल्यानें भवभूतीनें प्रस्तुत नाटकास उत्तररामचरित असें नांव दिलें आहे. रामाच्या पूर्व चरित्रावरहि त्यानें नाटक लिहिलें असून त्याला 'महावीरचरित' अशी त्यानें संज्ञा दिली आहे.

नामक एक दूत ऋष्यशृंगऋषींच्या आश्रमाहून तेथें आला व तिला म्हणाला, वसिष्ठ ऋषींनीं आपणांस निरोप सांगितला आहे कीं, 'सीते, तुझा प्रसूतिसमय समीप आला असल्यानें तुला सोमयागाला आणतां आलें नाहीं. तूं मुलास मांडीवर घेऊन खेळवीत बसशील त्या वेळीं तुला आम्ही भेटावयास येऊं.'

हें ऐकून रामास किंचित् हसूं आलें व तो आनंदित होऊन अष्टावक्रास म्हणाला, तथास्तु. मला कांहीं निरोप नाहीं का ?

"ऐकावें महाराज, 'तूं राज्याचीं सूत्रें नुकतींच धारण केलीं आहेस, करितां प्रजाजनांचें रंजन करण्याच्या कामीं दक्ष रहा' असा भगवान् वसिष्ठांचा आपणांस निरोप आहे." राम म्हणाला, होय, प्रजेला संतुष्ट ठेवण्याकरितां मी वाटेल तें करण्यास तयार आहें. त्यासाठीं प्रेमाचा, दयेचा, सुखाचा, फार काय सांगावें, प्रत्यक्ष जानकीचाहि त्याग करण्याची पाळी आली तरीसुद्धां माझ्या मनाला यत्किंचित् व्यथा होणार नाहीं.[१]

अशा प्रकारें त्यांचें बोलणें होत आहे, इतक्यांत लक्ष्मण तेथें येऊन म्हणाला, दादा, चित्रकारानें आपल्या आयुष्यांतील विविध प्रसंगांचीं चित्रें या दालनामध्यें काढून ठेविलीं आहेत, तीं वहिनींना दाखवूं का ?

सीतेच्या उदास मनाची करमणूक करण्याची ही उत्तम संधि आहे असा विचार करून राम सीतेस घेऊन तिकडे गेला. लक्ष्मण एकेक चित्र अनुक्रमानें दाखवीत असतां कित्येक वेळां त्यांना आनंद होई, तर केव्हां केव्हां आपण विरहदुःखाचा पुन्हा अनुभव घेत आहोंत असें त्यांस वाटे. दंडकारण्याचें चित्र पाहात असतां रामास पत्नीवियोगाचे स्मरण असह्य होऊन त्यानें लक्ष्मणास 'थांब, पुरें कर' म्हणून

---

१ स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि ।
आराधनाय लोकानां मुञ्चतो नास्ति मे व्यथा ॥

सांगितलें; आणि भागीरथी नदी पाहून सीतेस असे डोहाळे झाले कीं, तिच्या पवित्र उदकांत फिरून एकवार स्नान करून तेथेंच वनांत रहावें.

नंतर तिची हौस पूर्ण करण्याकरितां रामानें लक्ष्मणास रथ सज्ज करण्यास सांगितलें. लक्ष्मण आपल्या कामास गेल्यावर सीता स्मित करून रामास म्हणाली, आर्यपुत्र, आपणहि तिकडे चलायचें. त्यावर 'हें निराळें सांगायला का पाहिजे ?' असें रामानें प्रेमभरानें उत्तर दिलें.

अशा प्रकारें कांहीं वेळ त्यांचा विनोद चालला असतां चित्र-दर्शनानें परिश्रांत झाल्यामुळें सीतेस तेथेंच झोंप लागली.

इतक्यांत रामाचा दुर्मुख नांवाचा गुप्त हेर तेथें येऊन त्यानें सीतेबद्दलचा भयंकर लोकापवाद त्याच्या कानांत सांगितला. तो ऐकतांच राम वज्रप्रहार झाल्याप्रमाणें एकाएकीं मूर्च्छित होऊन पडला. सीताहि 'हा प्रियकरा, आपण कोठें आहात ?' असें स्वप्नांत भ्याल्यामुळें बडबडूं लागली.

थोड्या वेळानें सावध होऊन रामानें निरुपायास्तव सीतेस अर-ण्यांत सोडून देण्याचा निश्चय केला आणि मन कठोर करून त्यानें आपला निष्ठुर संकल्प लक्ष्मणास कळविण्यासाठीं दुर्मुखाच्या कानांत सांगितला.

दुर्मुख निघून गेल्यावर राम सीतेच्या पायावर मस्तक ठेवून घळघळां रडूं लागला. तोंच,

'लवण राक्षस आमच्या तपास विघ्न आणीत आहे' असा करुण स्वर त्याच्या कानीं पडला. क्षणभर आपलें दुःख गिळून तो भुवया वर चढवून क्रुद्ध मुद्रेनें म्हणाला, काय, अद्याप राक्षसांचा त्रास आहे काय ? तर मग मला आतांच्या आतां शत्रुघ्नाची तिकडे रवानगी केली पाहिजे. असें बोलून तो सीतेचें शेवटचें दर्शन घेऊन बाहेर निघून गेला.

कांहीं वेळानें सीता जागी झाली व इकडे तिकडे पाहून म्हणाली, काय मला एकटीला सोडून जायचें झालें? इतक्यांत लक्ष्मणानें रथ सज्ज केला आहे असें दुर्मुखानें आंत येऊन तिला कळविलें. 'ही पहा मी आलें' असें त्यास सांगून सीता जावयास निघाली. निघतांना तिनें रामास व रघुकुलदेवतांना मनानें वंदन केलें.

लक्ष्मणानें तिला भागीरथीतीरावरील तपोवनासान्निध सोडून दिलें आणि तो अयोध्येस परत फिरला.

त्या वेळीं सीतेची काय अवस्था झाली असेल बरें? अशा स्थितींत आपणाला एकटीलाच रामानें सोडून देण्याचें कारण तिच्या मुळींच ध्यानांत आलें नाहीं. ती मोठमोठ्यानें आक्रोश करूं लागली. शेवटीं, दुःखाचा भार दुःसह झाल्यामुळें एकदम तिनें गंगाप्रवाहांत उडी घेतली. तत्क्षणींच ती प्रसूत होऊन तिला जुळे मुलगे झाले. गंगा व पृथ्वी या देवतांनीं तिला सांवरून धरून तिचें सांत्वन केलें. मग त्या तिला आपल्या बरोबर पाताळांत घेऊन गेल्या. पुढें ते मुलगे कांहींसे मोठे होऊन अंगावरचे सुटल्यावर गंगादेवीनें त्यांना वाल्मीकिऋषींच्या स्वाधीन केलें.

भगवान् वाल्मीकींनीं स्वतः दाईप्रमाणें त्यांचें पालनपोषण केलें. क्षात्रविधीप्रमाणें अकराव्या वर्षी त्यांचें उपनयन करून त्यांस त्यांनीं वेदविद्याहि शिकविली. दोघांचीहि कुशाग्रबुद्धि असल्याचें त्यांना आढळून आलें.

इकडे राम अयोध्येंत कसे तरी दिवस कंठीत होता. सीतेचा त्याग केल्यामुळें त्यास पश्चात्ताप होई. पुढें अश्वमेध करण्याचें त्याच्या मनांत आलें असतां सहधर्मचारिणी म्हणून त्यानें सीतेची सोन्याची प्रतिमा करून तो आरंभिला. सर्व पृथ्वीवर संचार करण्याकरितां रामानें घोडा सोडिला. त्याच्या संरक्षणार्थ लक्ष्मणाचा पुत्र चंद्रकेतु याची योजना करून बरोबर चतुरंग सैन्यहि दिलें.

हा यज्ञसमारंभ चालला असतां एका ब्राह्मणानें आपल्या मृतपुत्राचें शव राजद्वारीं आणून टाकलें व तो मोठ्यानें विलाप करूं लागला. तें ऐकून रामाचें हृदय कळवळलें! राजाच्या दोषावांचून प्रजेस अकालमृत्यु येत नाहीं[1] असें त्याच्या मनांत येतें न येतें तोंच अकस्मात् आकाशवाणी झाली कीं,

'शंबूकनामक एक शूद्र तप करीत आहे. हे रामा, त्याचा शिरच्छेद करून ब्राह्मणपुत्रास जीवदान दे.'

हें ऐकतांच हातांत खड्ग घेऊन राम पुष्पक विमानांत बसून निघाला व त्या शूद्र तपस्व्याचा शोध करीत करीत तो जनस्थानांत आला. तेव्हां तेथें स्वतःस उलटें टांगून घेऊन तपश्चर्या करीत असलेला शंबूक त्याला आढळला. रामानें निरुपायास्तव त्याच्यावर खड्गप्रहार केला, तों काय आश्चर्य! त्याच्या शरीरांतून एक दिव्य पुरुष प्रकट झाला आणि त्या क्षणींच तो द्विजपुत्रहि जिवंत झाला.

आपला उद्धार केल्याबद्दल रामास वंदन करून शंबूक म्हणाला, 'मी किती भाग्यवान्! प्रत्यक्ष रामचंद्रप्रभु माझा शोध करीत या दंडकारण्यांत आले—'

'काय म्हटलेंस? हें दंडकारण्य?' असें मध्येंच स्मरण झाल्यासारखी मुद्रा करून रामचंद्रानें त्यास विचारलें—'खरेंच! तीर्थें, आश्रम, पर्वत व नद्या यांनीं भूषित झालेला हाच तो प्रदेश. जानकीला वनश्रीची केवढी आवड असे!' अशा प्रकारें त्याची पूर्वस्मृति जागृत होऊन त्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. कांहीं वेळानें रामाचा निरोप घेऊन अगस्त्यऋषींचें दर्शन घेण्याकरितां शंबूक निघून गेला. त्यांचा आश्रम समीपच होता. राम सन्निध आल्याचें वर्तमान अगस्त्यऋषि व त्यांची पत्नी लोपामुद्रा यांना शंबूकाकडून समजलें. त्यांनीं 'आपण उत्सुकतेनें वाट पाहात आहोंत' असा शंबूकाच्या मुखानें रामचंद्रास

---

१ न राजापचारमन्तरेण प्रजास्वकालमृत्युः सञ्चरति।

निरोप पाठविला. त्यांची आज्ञा मला शिरसावंद्य आहे असें म्हणून त्या उभयतांच्या दर्शनार्थ रामचंद्रहि तिकडे निघून गेला.

तिकडून परत अयोध्येकडे जातांना रामानें आपलें पुष्पक विमान पुन्हा त्या दण्डकारण्यांत थांबविलें. त्यास वाटलें कीं, पूर्वपरिचित स्थळें पाहून सीताविरहाचें दुःख अंमळ हलकें होईल. पण तसें न होतां वियोगदुःख उलट तीव्र व असह्य होऊन त्यास वेळोंवेळीं मूर्च्छा आली.

हा भावी अनर्थ मनांत येऊन त्याच सुमारास भागीरथी नदी सीतेस घेऊन गोदावरी नदीस भेटण्याकरितां तेथें आली होती. रामास विरहदुःखानें मूर्च्छा आली तर शुद्धीवर आणण्याचा उपाय तिनें पूर्वीच योजून ठेवला होता. तो कोणता ?

कुशलवांच्या वाढदिवसाप्रीत्यर्थ मंगलकृत्य करण्याच्या निमित्तानें भागीरथीनें सीतेस बरोबर आणलें होतें. राम तिकडे येणार आहे वगैरे गोष्टी तिच्या स्वप्नींहि नव्हत्या. 'आमच्या प्रभावानें तूं कोणास दिसणार नाहींस' असा सीतेस वर देऊन तिच्या बरोबर भागीरथीनें तमसेलाहि आणिलें होतें.

पंचवटीच्या दर्शनानें रामाप्रमाणेंच सीतेची अवस्था झाली. 'हा आर्यपुत्रा, हे नाथा,' असा टाहो फोडून तीहि मूर्च्छित होऊन पडली. इतक्यांत पुष्पक विमान तेथें येऊन धडकलें.

'विमानश्रेष्ठा, येथेंच थांब,' हे रामाचे अमृतमय शब्द सीतेच्या कानीं पडतांच ती खडबडून सावध झाली. तों, प्रभातकालच्या चंद्राप्रमाणें क्षीण झालेली सौम्य आणि गंभीर अशी रामचंद्राची मूर्ति दृष्टीस पडून तिला दुःखमिश्रित आनंद झाला.

पंचवटींत येतांच रामाच्या हृदयांत आजवर धुमसत असलेला दुःखाग्नि भडकला. 'हे प्रियसखि, हे जानकि,' असे उद्गार त्याच्या मुखावाटे निघताहेत तोंच त्यास मूर्च्छेनें घेरलें.

मग तमसेच्या सांगण्यावरून सीतेनें रामास हस्तस्पर्श केला तेव्हां तो सावध झाला आणि हा सीतेचाच स्पर्श आहे अशा भावनेनें तो म्हणाला, 'हे प्रिये, तुझा स्नेहार्द्र स्पर्श माझें शरीर शीतल करीत आहे. तूं तर येथें दिसत नाहींस, आहेस कोठें?' हे उद्गार जणूं आनंदरसाची वृष्टिच करीत आहेत असें सीतेस वाटलें. अर्थात् भागीरथीच्या वरामुळें ती रामास दिसली नाहीं, व त्यास असें वाटलें कीं, सीतेच्या अहर्निश निदिध्यासामुळें आपणांस हा केवळ भ्रम होत आहे.

इतक्यांत पंचवटींत राहणारी वासंती नांवाची वनदेवता रामाकडे येऊन घाबऱ्या घाबऱ्या सांगू लागली कीं, सीतेनें ज्यास पूर्वी आपल्या हातानें वाढविलें त्या हत्तीच्या छाव्यावर दुसरा एक मोठा हत्ती चाल करून येत आहे. हें ऐकून त्यास सोडविण्याकरितां राम वासंती-बरोबर तिकडे गेला. परंतु तेथें जाऊन पाहातो तों, तोच छावा विजयी होऊन खुशाल जलक्रीडा करीत आहे असें त्यास दिसलें. तमसा व सीता रामचंद्राच्या पाठोपाठ तेथें आल्या छाव्यास पाहून सीता म्हणाली, 'अगबाई! एवढा का हा मोठा झाला आहे? इतक्या दिवसांत कुशलव किती मोठे झाले असतील कोण जाणे. मी मेली फुटक्या नशिबाची. मला आर्यपुत्रांचे चरण अंतरले एवढेंच नव्हे तर माझे पुत्रहि मजपासून दूर गेले आहेत. माझे लाडके मला केव्हां बरें भेटतील?' यावर तिचें समाधान करीत तमसा म्हणाली, सीते, देवतांच्या प्रसादानें हेंहि घडून येईल.

हें ऐकून कांहींसें समाधान वाटून सीता म्हणाली, बाई तमसे, माझ्या बाळांचें स्मरण होऊन वात्सल्यानें माझें अंतःकरण भरून आलें आहे. तेव्हां मध्येंच तमसा म्हणाली, अग, हें काय सांगावें? अपत्य म्हणजे स्त्रीपुरुषांच्या आनंदाची मूर्तिमंत ग्रंथिच होय.'

---

१ आनन्दग्रन्थिरेकोऽयमपत्यमिति बध्यते ।

अशा प्रकारें त्यांचा संवाद चालला असतां, इकडे वासंती रामास पूर्वपरिचित पशुपक्षी दाखवीत होती. बोलतां बोलतां तिनें सीतेविषयीं मुद्दाम गोष्टी उकरून काढून तिचा त्याग केल्याबद्दल रामाची मर्मभेदक शब्दांनीं निर्भर्त्सना केली. तेव्हां रामास गहिंवर येऊन पूर्ववत् मूर्च्छेनें त्यास पछाडलें. वासंती घाबरली. आपण कोठून रामास बोललों असें तिला झालें. हा प्रकार तमसेच्या दृष्टीस पडतांच तिनें सीतेकडून पूर्वीप्रमाणें रामास हस्तस्पर्श करविला व त्यास सावध केलें.

वासंतीच्या जिवांत जीव आला व रामास उगीचच्याउगीच वाक्-प्रहार केल्याबद्दल तिला फार पश्चात्ताप होऊं लागला.

कांहीं वेळानें वासंतीचा निरोप घेऊन अश्वमेध पुरा करण्याकरितां राम अयोध्येस निघून गेला. सीताहि रामास मनानें वंदन करून तमसेबरोबर मोठ्या कष्टानें निघून गेली.

---

भाग दुसरा.

रामानें निष्कारण सीतेला अरण्यांत सोडून दिल्याची हृदयविदारक वार्ता ऐकतांच जनकाची कंबर खचली. त्यानें तेव्हांपासून वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार केला. एके दिवशीं आपला फार दिवसांचा प्रियमित्र वाल्मीकि यास तो भेटण्यास आला. वसिष्ठ, अरुन्धती, कौसल्या इत्यादि मंडळीहि सोमयागाची समाप्ति झाल्यावर ऋष्यशृंगाच्या आश्रमाहून वाल्मीकीच्या आश्रमास आलेली होती. अयोध्येंत सीता नसल्यामुळें तिकडे जाण्यास त्यांचें मन घेईना.

जनकराजास दुरून येतांना पाहातांच कौसल्येस सीतेची आठवण

होऊन ती दुःखावेगानें मूर्च्छित होऊन पडली. 'अरे हें काय ?' असे उद्गार काढीत जनकराजानें तिच्या अंगावर कमंडलूंतील पाणी शिंपडलें, तेव्हां ती हळूहळू सावध झाली. मग तिचें समाधान करीत अरुंधतीनें म्हटलें, हे राजकन्ये, असा धीर खचूं देऊं नको. शेवट गोड होईल असें ऋष्यशृंगाच्या आश्रमांत कुलगुरूंनीं सांगितलेलें तूं विसरलीस काय ?

इतक्यांत कांहीं मुलें गलबला करीत तेथें आलीं. आश्रमांत पाहुणे मंडळी आल्यामुळें त्यांना त्या दिवशीं सुट्टी मिळाली होती. सुट्टी म्हणजे मुलांना आनंदीआनंद! खेळाशिवाय त्यांना काय सुचणार ?

त्या मुलांपैकीं एका मुलाकडे निरखून पाहून कौसल्या उत्सुकतेनें म्हणाली, अगबाई, हा कोण बरें ? याचा तोंडावळा हुबेहुब रामचंद्रासारखा दिसतो आहे! याच्या ऐटदार, गोंडस व मनोहर मुखाकडे पाहून माझी तहानभूक निवाली.

अरुंधतीनें लगेच त्याला जवळ बोलाविलें व आपल्या मांडीवर बसवून त्याला कुरवाळलें; तेव्हां तिच्या डोळयांत आनंदाश्रु उभे राहिले.

भागीरथीनें तिच्या कानांत एक गुप्त गोष्ट सांगितली होती तिचें आतां तिला स्मरण झालें. पण कुशलवांपैकीं हा कोण याचा मात्र तिला उलगडा होईना. जनकास तर वाटलें कीं, प्रत्यक्ष रामचंद्रच बाळ होऊन आला आहे. 'भगवतीचा काय तर्क आहे ?' असें त्यानें अरुंधतीस विचारलें. यावर 'आम्ही आजच येथें आलों' असें उडवाउडवीचें उत्तर देऊन तिनें वेळ मारून नेली.

नंतर कौसल्येनेंहि त्यास मांडीवर घेऊन 'बाळ, कुणाचा तूं ?' असें लडिवाळपणानें विचारलें.

'भगवान् वाल्मीकीचा. माझें नांव लव आणि माझ्या वडील

भावाचें कुश. तो सध्यां भरतमुनींच्या आश्रमीं गेला आहे. एवढेंच मला ठाऊक आहे.'

अशा प्रकारें त्यांचें संभाषण चाललें असतां त्या मुलाचे खेळगडी तेथें धावत धावत आले आणि 'अश्व नांवाचा एक चमत्कारिक प्राणी आज आम्हीं पाहिला, चल चल, तुला दाखवितों' असें म्हणून त्याचा हात धरून ते तिकडे गेले. आतां जनकाची जिज्ञासा वाढत चालली. नंतर 'चला आपण वाल्मीकींकडे जाऊन हें काय रहस्य आहे तें त्यांना विचारूं' असें त्यानें सुचविल्यावरून सर्व वृद्ध मंडळी त्यांच्या पर्णकुटीकडे जावयास निघाली.

तिकडे गेल्यावर भोंवतीं रक्षक असलेल्या त्या श्यामकर्ण वारूकडे पाहून 'हा निःसंशय अश्वमेधाचा घोडा आहे' असें लवानें ताडलें. 'सप्तलोकांतील अद्वितीय वीर जो राम त्याचा हा अश्व आहे' अशी घमेंडीची घोषणा ऐकून मात्र लवाला त्वेष आला व त्याचे बाहु स्फुरण पावूं लागले, आणि ऋषिकुमारांनीं घोडा अडविल्यामुळें चंद्रकेतूचें सैन्य चालून आलें म्हणून तत्काळ त्यानें धनुष्य सज्ज केलें आणि थोडक्याच वेळांत सर्व सैन्याची वाताहत करून सोडली.

हें वर्तमान ऐकून सैन्याचा अधिपति चंद्रकेतु त्याच्याशीं युद्ध करावयास आला. ह्या एकट्या वीराशीं इतक्यांनीं झुंजावें, हें त्यांस आवडलें नाहीं. तो लवास उद्देशून म्हणाला, हे महाबाहो लवा, या सैनिकांशीं तुला काय करावयाचें आहे ? हा पहा मी आलों आहें, मजसमोर ये. तेजस्वी पुरुषानें तेजस्वी पुरुषाशींच लढण्यास सिद्ध व्हावें[1].

नंतर लवानें जृंभकास्त्राचें ध्यान करून चंद्रकेतूच्या सैन्यास चित्राप्रमाणें स्तब्ध केलें आणि मग चंद्रकेतूचा समाचार घेण्यास तो

१ तेजस्तेजसि शाम्यतु ।

निघाला. पण दुरून ते एकमेकांकडे निरखून पाहात असतां, दोघांच्याहि मनांत एकमेकांविषयीं आदर व प्रेम उत्पन्न झालें. तेव्हां परस्परांना उद्देशून ते स्नेहानें उद्गारले, 'याला पाहातांच माझें अंतःकरण याच्याकडे कां बरें ओढ घेत आहे?'

मग जवळ आल्यावर दोघांचीं वीरश्रीचीं भाषणें झालीं. तीं त्यांना साजेशींच होतीं. पण रामाचा प्रताप व उत्कर्ष सहन न होऊन जेव्हां लवानें त्यास दोष दिला तेव्हां मात्र चंद्रकेतूचें पित्त खवळलें. दोघेहि हट्टास पेटून द्वंद्वयुद्धास सुरवात झाली या सूर्यवंशी कुमारांचा अचाट पराक्रम पाहून देवदानवदेखील आश्चर्यानें चकित झाले व त्यांनीं त्यांच्यावर पुष्पवृष्टि केली.

इतक्यांत शंबूकवधार्थ गेलेले रघुपति पुष्पकविमानांतून उतरून अचानक त्या कुमारांच्यामध्यें येऊन उभे राहिले! दुरून येत असतांना त्यांनीं हात वर करून आपल्या मधुर शब्दानें चंद्रकेतूस युद्ध बंद करण्यास आज्ञा केली. लवहि त्या पुरुषाच्या गौरवार्थ युद्ध थांबवून शांत व स्वस्थ उभा राहिला.

रामानें चंद्रकेतूस शाबासकी देऊन गाढ आलिंगन दिलें. त्यास चंद्रकेतूनें प्रणिपातपूर्वक म्हटलें, या महावीराकडे आपण कृपादृष्टीनें पाहावें. लवाकडे वळून पाहातांच रामास एकाएकीं दुःखाचा विसर पडला व त्याच्या हृदयांत वात्सल्य उत्पन्न झालें. रामचंद्राचें दर्शन होतांच लवाचाहि उद्धटपणा कोणीकडच्या कोणीकडेच गेला.

'हे कोण?' असा लवानें चंद्रकेतूस प्रश्न केला. 'रामायणकथेचा मुख्य पुरुष म्हणतात तो हाच' असें समजतांच लवानें आपलें नांव सांगून रामास विनयानें वंदन केलें. रामानें त्यास जवळ घेऊन पोटाशीं घट्ट धरलें. मग लवानें रामाच्या आज्ञेवरून जृंभकास्त्रें आवरलीं व रामास म्हटलें, ताता, माझ्या पोरपणाबद्दल क्षमा असावी.

'अरे हें तर क्षत्रियांना भूषणावह आहे. तेजस्वी पुरुषाला दुसऱ्याचें प्रकट झालेलें तेज कधींहि सहन होत नाहीं.'[1]

इतक्यांत भरतमुनीच्या आश्रमांतून कुशहि तेथें आला. त्याची ती ऐट व तो आविर्भाव पाहून हा मूर्तिमंत वीररसच आहे असें रामास वाटलें. 'हे रामायणकथेचे नायक आहेत, ते आपणां उभयतांवर प्रेम करितात' असें लवानें कुशास सांगितल्यावरून त्यानें नम्रपणानें आपलें नांव सांगून रामास वंदन केलें.

रामानें त्यालाहि वात्सल्यानें दृढ आलिंगन दिलें. त्या वेळीं 'हीं मुलें आपलींच असतील का' अशी त्याच्या मनांत शंका उत्पन्न झाली. नंतर या दोघा बंधूंना जन्मतः जृंभकास्त्रें प्राप्त झालीं असल्याची हकीकत लवाच्या तोंडून ऐकून रामास थोडासा धीर आला. कारण तीं गुरुपरंपरेशिवाय प्राप्त होत नसतात. रामास तीं विश्वामित्रानें दिलेलीं होतीं व रामापासून लवकुशांस जन्मतः प्राप्त झालीं होतीं.

थोड्या वेळानें अरुंधतीसह भगवान् वसिष्ठ, जनक व कौसल्या समोरून येत असतां रामाची व त्यांची दृष्टादृष्ट झाली. 'हायरे दैवा, मी यांना तोंड कसें दाखवूं ? मी दुष्ट यांच्या करुणेस पात्र नाहीं' असे दुःखोद्गार काढीत रामचंद्र त्यांस वंदन करण्याकरितां आश्रमाकडे निघून गेला.

त्याच दिवशीं भगवान् वाल्मीकींनीं रचलेल्या एका नाटकाचा अप्सरांकडून प्रयोग होणार होता. आश्रमांत आलेल्या सन्मान्य पाहुणेमंडळींच्या रंजनासाठीं व कांहीं विशिष्ट हेतूनें हा खेळ करविण्याचें वाल्मीकिऋषींनीं ठरविलें होतें. तन्निमित्त रामास व लक्ष्मणास त्यांनीं निमंत्रण दिलें होतें. सर्व पौरजनांना व देवदानवादि यच्चयावत् जीवांनाहि त्यांनीं आपल्या प्रभावानें तेथें खेळ पाहण्यास आणविलें होतें.

---

१ न तेजस्तेजस्वी प्रसृतमपरेषां विषहते ।

भागीरथीच्या तीरीं, उघड्या हवेंत प्रशस्त वाळवंटावर रंगभूमि सजवली होती. लक्ष्मणाकडे प्रेक्षकांची बसण्याची व्यवस्था दिलेली होती. राम, कुश, लव, चंद्रकेतु इत्यादि मंडळी आपापल्या जागीं उत्सुकतेनें येऊन बसल्यावर लक्ष्मणानें नाटकप्रयोग चालू करण्यास सांगितलें.

## नाट्यप्रयोग

सीतेची भूमिका घेणारी अप्सरा एकाएकीं पडद्यांत आक्रोश करते; 'हा आर्यपुत्रा, हा वत्सा लक्ष्मणा, मी येथें एकटी अनाथ व असहाय स्थितींत आहें; हीं श्वापदें मला खाऊन टाकण्याला टपलीं आहेत. काय करूं? मी आतां गंगेच्या प्रवाहांत उडी घेतें!'

[ राम (श्रोतृवृंदांतून)– देवि, धीर धर! धीर धर! माझ्यामुळेंच तुला अशी शोचनीय स्थिति प्राप्त व्हावीना?

लक्ष्मण–पण दादा, हें नाटक चाललें आहे! ]

[ पात्रप्रवेश–सीता, भागीरथी व पृथ्वी. ]

**पृथ्वी व भागीरथी**–सीते, सावध हो. तुला दोन मुलगे झाले आहेत. तूं दैववान् आहेस.

**सीता**–(सावध होऊन व दोघींच्या मांडीवर दोन मुलगे पाहून) बरें झालें बाई! दोघेहि मुलगेच झाले. हा आर्यपुत्रा! (असे उद्गार काढून मूर्च्छित होते.)

(हें नाटक चाललें आहे, याचें विस्मरण होऊन रामासहि क्षणभर मूर्च्छा आली.)

**उभय देवता**–वत्से, सावध हो!

**सीता**–आई, आई! या स्थितींत का ग तुझी भेट व्हावी?

**पृथ्वी**–( सीतेस आलिंगिते व भागीरथीस उद्देशून म्हणते ) भागीरथि, असें करणें तुमच्या रामास शोभतें का ?

(राम–माते पृथ्वि, मी आहें खरा तसा.)

**भागीरथी**- अग, रामानें हें योग्यच केलें म्हणावयाचें ! सर्व लोकांचें आराधन करणें हें त्याचें कुलव्रत व लोकांमध्यें तर सीतेबद्दल दुर्लौकिक पसरलेला. अग्निशुद्धि लंकेंत झालेली. तिजवर लोकांचा विश्वास कसा बसावा ? अशा कठीण प्रसंगांत त्यानें काय बरें करावें ?

**पृथ्वी**–मला रामभद्राचें सीतेवरील प्रेम ठाऊक नाहीं, असें नाहीं. पण दुःखाचा वेग असह्य होऊन मी तसं बोललें बाई !

**सीता**– (हात जोडून रडत, कण्हत ) आई, आई, मला आतां तुझ्या उदरांत ठाव दे. मी कपाळकरंटी........

**उभय देवता**–भलतेंच ! तुला या मुलांचें संगोपन करायचें आहे. तुझ्या संसर्गानें आमचेंसुद्धां पावित्र्य उज्ज्वल होईल !

( राम–नीट लक्ष देऊन लोकांनीं ऐकावें.)

**उभय देवता** -ऐकलेंस का सीते, हे मुलगे अंगावर प्यायचे सुटले म्हणजे आम्ही यांना वाल्मीकीच्या स्वाधीन करणार आहोंत बरें ! ( गंगा, पृथ्वी व सीता जातात.)

**नाट्यप्रयोग समाप्त**

---

राम–काय ? एकूण सीतेचा शेवट झाला ! (मूर्च्छित होतो.)

लक्ष्मण–भगवन् वाल्मीके, धावाहो धावा !

( इतक्यांत सीता व उभय देवता पाण्यांतून वर येतात.)

अरुंधती–वत्से, तूर्त भीडलज्जा सोडून रामभद्रास हस्तस्पर्श कर व त्यास जीवदान दे.

राम—( सीतेचा करस्पर्श होतांच सावध होऊन आनंदानें ) ही तर देवीच, जानकि,—

अरुंधती— हे पौरजनहो, पृथ्वी व भागीरथी यांनीं जिच्या शीलाची प्रशंसा केली आहे त्या सीतेबद्दल तुमचें काय मत आहे?

( अखिल जीव सीतेस वंदन करूं लागले; देवांनीं आकाशांतून पुष्पवृष्टि केली.)

अरुंधती—वाल्मकि, सीतेचे पुत्र कुशलव मातापितरांस आणून भेटवावेत.

सीता—(उत्सुकतेनें व हर्षानें ) कुठं आहेत माझे लाडके पाहूं?

वाल्मीकिः—हे वत्सांनो, हा रघुपति तुमचा पिता, ही सीता तुमची माता. यांना वंदन करा. ( उभयतां मातापितरांनीं पुत्रांस वात्सल्यानें आलिंगन दिलें. इतक्यांत लवणराक्षसाचें पारिपत्य करून शत्रुघ्नहि तेथें आला. )

लक्ष्मण—सुखें येऊं लागलीं म्हणजे अशीं एका पाठीमागून एक येतात.

सर्वांच्या नेत्रांत आनंदाश्रु येऊन त्यांनीं वाल्मीकीस वंदन केलें. 'वत्से, अशीच पतिपुत्रांसमवेत चिरकाल सुखानें रहा' असा वाल्मीकीनें सीतेस आशीर्वाद दिला व रामास विचारलें, 'रामभद्रा, आणखी तुझें काय प्रिय करावें, सांग.' यावर रामानें उत्तर दिलें.

"ही मंगलकारक व मनोहर कथा जगास पावन करो, व लोकांच्या सुखसमृद्धींत भर पडो एवढीच इच्छा."

---

१ सानुपङ्गाणि कल्याणानि।

# टिप्पणी

**कालिदासः**—हा कविसम्राट केव्हां होऊन गेला याचा निर्णय अद्याप झाला नाहीं. अनेक विद्वानांच्या मतें तो इ. सनाच्या चवथ्या शतकांत होऊन गेला. शाकुन्तल, विक्रमोर्वशीय व मालविकाग्निमित्र हीं तीन नाटकें, कुमारसंभव व रघुवंश हीं दोन महाकाव्यें आणि मेघदूत व ऋतुसंहार हीं दोन खंडकाव्यें असे सात ग्रंथ यानें लिहिले. पैकीं शाकुन्तल नाटकाला नाट्यवाङ्मयांत सर्वजण अग्रपूजेचा मान देतात.

## शाकुन्तल.

**कुलपति**—दहा हजार शिष्यांचें पोषण करून त्यांना शिकविणारा ऋषि.

**मालिनी**—पश्चिम रोहिलखंडांतील एक लहान नदी.

**पौरव**— सोमवंशांतील पुरुनामक राजाचा वंशज.

**गांधर्वविवाह**—प्रीतिविवाह.

**हस्तिनापुर**—हस्ति नांवाच्या राजानें वसविलेलें नगर. दिल्लीच्या आग्नेयेस. हल्लीं नामशेष झालें आहे.

**कंचुकी**—अंतःपुरावरील द्वारपाल, भालदार. ( अंतःपुर—राणीवसा, जनानखाना.)

**आर्यपुत्र**—संस्कृत नाटकांत स्त्रिया नवऱ्याला 'आर्यपुत्र' या नांवानें संबोधितात.

## विक्रमोर्वशीय

**पुरूरवा**—सोमवंशाचा मूळ पुरुष.

**चित्ररथ**—गंधर्वांचा राजा. (गंधर्व — देवांचे गवई. )

**प्रमदवन**—राजाच्या अंतःपुरालगत असलेलें क्रीडोद्यान.

**वारुणी**—वरुणाची पत्नी.

**गंधमादन**—हिमालयाच्या उत्तरेकडील एक पर्वत.

**च्यवन**—भृगुकुलोत्पन्न एक ऋषि.

**जातकर्म**—जन्मकालचा संस्कार.

**शूद्रक**-या कवीच्या कालासंबंधीं व त्याच्या मृच्छकटिकाच्या उपलब्ध स्वरूपाविषयीं फार मतभेद आहे. हा बहुधा इ. स. च्या दुसऱ्या शतकांत होऊन गेला असावा.

## मृच्छकटिक

**विट**-श्रीमंत माणसाचा रसिक व विलासी सखा.

**कायस्थ**-लेखक

**कुशावती**-रामपुत्र कुशानें स्थापिलेली नगरी; बुंदेलखंडातील रामनगर असावें.

---

**भास**-ह्या कवीचीं नाटकें २०-२२ वर्षांपूर्वी त्रावणकोर संस्थानामध्यें उपलब्ध झालीं. तत्पूर्वी त्याचें नांवच काय तें संस्कृतज्ञांस माहीत होतें. याचीं स्वप्नवासवदत्त, प्रतिज्ञायौगंधरायण, अविमारक, प्रतिमा इत्यादि तेरा नाटकें, त्रिवेंद्रम् संस्कृत सेरीजमध्यें १९१३ सालीं प्रथम छापून प्रसिद्ध झालीं. हा इ. सनापूर्वी ( पांचशें वर्षे ) होऊन गेला असें मानतात.

---

**भट्टनारायण**-हा 'कनोज ( कान्यकुब्ज ) नगरचा रहिवासी ब्राह्मण होता. हा ७ व्या शतकांत होऊन गेला. ह्यानें वेणीसंहार हें प्रसिद्ध नाटक लिहिलें आहे.

---

**विशाखदत्त**-हा ८ व्या शतकांत होऊन गेला. याचें 'मुद्राराक्षस' नाटक संस्कृतवाङ्मयांत अनेक दृष्टींनीं अद्वितीय आहे. कारण राजकारणावर लिहिलेलें असें एकच नाटक होय.

## मुद्राराक्षस

**विषकन्या**-जिचा स्पर्श झाला असतां मनुष्यास विषाची बाधा होते, तिला विषकन्या म्हणतात.

---

**भवभूति**--हा कवि इ. स. च्या ८ व्या शतकांत विदर्भ प्रांतांत म्हणजे वऱ्हाडांत होऊन गेला. ह्याचीं मालतीमाधव, महावीरचरित व उत्तररामचरित अशीं तीन नाटकें आहेत. त्यांपैकीं उत्तररामचरित हें सर्वोत्कृष्ट आहे.

## उत्तररामचरित

**ऋष्यशृंगऋषि**-- दशरथाची कन्या शांता हिचा पति. याच्या मस्तकावर ऋष्यजातीच्या मृगाचें शिंग होतें. म्हणून यास ऋष्यशृंग असें नांव पडलें.

**जनस्थान**-- नाशिकजवळचा भाग. वनवासांत रामाचें येथें कांहीं दिवस वास्तव्य होतें.

**दंडका**-नर्मदा व गोदावरी यांमधला प्रदेश.

**तमसा**-रेवा प्रांतांतून ईशान्येकडे वहात जाऊन भागीरथीला मिळणारी नदी. हल्लींची तानसा. हिच्या कांठीं वाल्मीकीचा आश्रम होता.

**जृंभकास्त्र**-जांभया व निद्रा आणणारें अस्त्र.

# सुंदर सूक्तिसुमनें

## अभिज्ञानशाकुन्तल

१ राजरक्षितव्यानि तपोवनानि नाम ।
२ स्निग्धजनसंविभक्तं दुःखं सह्यवेदनं भवति ।
३ धूमाकुलितदृष्टेर्यजमानस्य पावके एवाहुतिः पतिता ।
४ ओदकान्तं स्निग्धो जनोऽनुगन्तव्यः ।
५ अतिस्नेहः पापशङ्की ।
६ इदं तत्प्रत्युत्पन्नमति स्त्रैणमिति यदुच्यते ।

## विक्रमोर्वशीय

१ वसुधाधरकन्दराभिसर्पी प्रतिशब्दोऽपिहरेर्भिनत्ति नागान् ।
२ छिन्नबन्धे मत्स्ये पलायिते निर्विण्णो धीवरो भणति 'धर्मो मे भविष्यति' इति ।
३ अहो सुखप्रत्यर्थिता दैवस्य ।
४ परस्परविरोधिन्योरेकसंश्रयदुर्लभम् ।
संगतं श्रीसरस्वत्योर्भूतयेऽस्तु सदा सताम् ।

## मृच्छकटिक

१ सुखं हि दुःखान्यनुभूय शोभते ।
घनान्धकारेष्विव दीपदर्शनम् ।
२ भाग्यक्रमेण हि धनानि भवन्ति यान्ति ।
३ पुरुषेषु न्यासा निक्षिप्यन्ते न पुनर्गेहेषु ।
४ साहसे श्रीः प्रतिवसति ।
५ न ह्याकृतिः सुसदृशं विजहाति वृत्तम् ।
६ पुरुषभाग्यानामचिन्त्याः खलु व्यापाराः ।
७ यज्ञोपवीतं नाम ब्राह्मणानां विभूषणम् ।

८ न भीतो मरणादस्मि केवलं दूषितं यशः।
९ अभयं शरणागतस्य।

## स्वप्नवासवदत्त

१ यद्यस्यास्ति समीप्सितं वदतु तत् कस्याद्य किं दीयताम्।
२ दुःखं न्यासस्य रक्षणम्।

## वेणीसंहार

१ ग्रहाणां चरितं स्वप्नोऽनिमित्तान्युपयाचितम्।
फलन्ति काकतालीयं तेभ्यः प्राज्ञा न बिभ्यति।
२ वक्तुं सुकरम्, अध्यवसितुं दुष्करम्।
३ दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम्।

## मुद्राराक्षस

१ बुद्धिस्तु मा गान्मम।
२ दिष्ट्या मित्रकार्येण मे विनाशः न पुरुषदोषेण।
३ दैवेनोपहतस्य बुद्धिरथवा पूर्वं विपर्यस्यति।
४ अलक्षितनिपाताः पुरुषाणां समविषमदशापरिणतयो भवन्ति।
५ नमः सर्वकार्यप्राप्तिपत्तिहेतवे सुहृत्स्नेहाय।

## उत्तररामचरितम्।

१ स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि।
आराधनाय लोकानां मुञ्चतो नास्ति मे व्यथा।
२ न राजापचारमन्तरेण प्रजास्वकालमृत्युः सञ्चरति।
३ अंतःकरणतत्त्वस्य दंपत्योः स्नेहसंश्रयात्।
आनन्दग्रन्थिरेकोऽयमपत्यमिति बध्यते।
४ तेजस्तेजसि शाम्यतु।
५ न तेजस्तेजस्वी प्रसृतमपरेषां विषहते।
६ सानुषङ्गाणि कल्याणानि।

---

# मुद्रणदोष

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| २ | २१ | महर्षाना | महर्षींना |
| १२ | २३ | गाष्टाच | गोष्टींचें |
| २८ | २ | शर | शूर |
| २९ | ५ | पुढ वभव | पुढें वैभव |
| ३२ | ६ | ह्यातांतली | ह्यातांतळें |
| ३३ | १ | चारी | चोरी |
| ७२ | १६ | भाम | भीम |
| ७८ | ९ | आंगठा | आंगठी |



# विद्वानांचे अभिप्राय

रा. नी. शं. नवरे यांचें "संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें" हें हस्तलिखित पुस्तक मीं समग्र वाचिलें. मला तें फार आवडलें. शाळेंतील विद्यार्थ्यांस संस्कृत वाक्यें वाचतांना संदर्भाच्या अभावीं तीं नीट कळत नाहींत. **ह्या पुस्तकाच्या वाचनानें नाटकांतील वाक्यांपुरती तरी अडचण दूर होईल. पुस्तकांतील भाषा नीटनेटकी व कथांची मांडणी सुबक आहे, कथानक शक्य तितका जपून लिहिल्याबद्दल मला रा. नवरे यांचें कौतुक करावेंसें वाटतें.** ह्या त्यांच्या लेखनव्यवसायाबद्दल त्यांस यश येवो असें मी मनापासून इच्छितों.

पुणें, ता. ९ नोव्हेंबर १९२७ } **म. दा. ओक**
संस्कृत अध्यापक.

इंग्रजींत ज्याप्रमाणें शेक्सपियरच्या नाटकाचीं कथानकें मुळांतलें स्वारस्य न जाऊं देतां व फार संक्षेपहि न करितां मुलांच्यासाठीं 'लॅम्ब्स टेल्स' नांवाच्या पुस्तकांत दिलीं आहेत, त्याप्रमाणें आपल्या कालिदास, भवभूति, भास इ. सुप्रसिद्ध संस्कृत कवींच्या नाट्यकृतींशीं महाराष्ट्रांतल्या बालवाचकांचा परिचय करून देण्याचें काम कोणी चांगल्या लेखकानें हातीं घ्यावयास पाहिजे होतें व तें रा. नी. शं. नवरे यांनीं 'संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें' या पुस्तकाच्या द्वारें चांगल्या प्रकारें केलें आहे. असें मी सदर पुस्तकाचा कांहीं भाग पाहिला आहे. त्यावरून म्हणूं शकतों. **हें पुस्तक हायस्कुलांतल्या चौथ्या पांचव्या यत्तांतल्या विद्यार्थ्यांसाठीं वाचनपुस्तक म्हणून ठेवितां येईल.** अशा प्रयत्नांस शाळाखात्यानें व विद्यार्थ्यांच्या पालकांनीं अवश्य उत्तेजन द्यावयास पाहिजे. मुलांसाठीं हें पुस्तक तयार करण्यांत **लेखकानें विवेचकदृष्टि चांगली वापरली आहे. भाषाहि साधी व गोड आहे.**

आनंदकार्यालय, } **वा. गो. आपटे**, बी. ए,
पुणें, ७-११-२७, } संपादक, 'आनंद'.

रा. रा. नवरे यांचें 'संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें' हें पुस्तक शाळेंतील विद्यार्थी व सामान्य वाचक या दोघांसहि मनोरंजक वाटेल यांत शंका नाहीं. संस्कृत वाङ्मयांत जी अमूल्य ग्रंथसंपत्ति आहे तिची मराठी भाषेच्या द्वारें वाचकांस

ओळख करून देऊन त्या भाषेच्या अध्ययनाकडे त्यांच्या मनाची प्रवृत्ति वळविण्यास अशा पुस्तकांचा फार उपयोग होईल. या पुस्तकांतील कथानकें संक्षिप्त असूनहि मनोरंजक आहेत. व त्यांची भाषाहि शुद्ध व साधी आहे. तरुण वाचकांस योग्य अशा वाचनीय पुस्तकांत एका चांगल्या पुस्तकाची भर घालण्याचा हा प्रयत्न अभिनंदनीय आहे. यांत शंका नाहीं.

पुणें }
ता. २७-१२-२७ }

विश्वनाथ बळवंत नाईक. एम्. ए.
प्रोफेसर, फर्ग्युसन कॉलेज.

माझे मित्र श्री. नीलकंठ शंकर नवरे ह्यांनीं लिहिलेलें 'संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें' हें पुस्तक मला आवडलें, कारण पुस्तकांतील सर्व कथा अगदीं आटपशीर आणि सोप्या भाषेंत लिहिलेल्या आहेत. मुद्राराक्षस किंवा मृच्छकटिक अशा लांबच लांब नाटकांतील गुंतागुंतीचें संविधानक थोडक्यांत आणि चटकदार रीतीनें सांगणें हें काम आपल्याला वाटतें तितकें सुलभ नाहीं पण तें रा. नवरे यांनीं चांगलें पार पाडलें आहे. वाचकांचें लक्ष आपल्याकडे ओढून घेऊन कोठेंहि रसभंग होऊं न देतां एकादी गोष्ट सांगणें ही कला एक आहे आणि गोष्ट लहानथोरांना कोणालाहि सांगितली तरी गोष्ट सांगण्याचें चातुर्य त्याच्या गोष्टींत प्रगट झालेंच पाहिजे. उत्तम गोष्ट सांगितली असें आपण केव्हां म्हणूं ? जेव्हां गोष्ट सांगणारा सरळ व साध्या एकाच मार्गानें जातो आणि आपलें पाऊल झपाझप उचलतो तेव्हां. आपण सांगितलेल्या एकापाठीमागून एक येणाऱ्या प्रसंगांमुळेंच कथेंतील वैचित्र्याचा आणि रसाचा परिपोष होतो. हे तो जाणतो आणि म्हणूनच वर्णनाचा पाल्हाळ, अनावश्यक मुद्यांचा सल, त्याच त्याच गोष्टींचें चर्वितचर्वण इत्यादि दोषांपासून तो अलिप्त राहतो. वर उल्लेखिलेले सर्व गुण थोड्याफार अंशांनीं प्रस्तुत पुस्तकांत आढळून येतील. चौथ्या पांचव्या इयत्तेंतील विद्यार्थ्यांना त्याचप्रमाणें संस्कृताचा परिचय नसलेल्या परंतु संस्कृतवाङ्मयाविषयीं कौतुक व प्रेम असणाऱ्या निवळ मराठी वाचकांना हें पुस्तक उपयुक्त होईल असा मला भरंवसा वाटतो.

पुणें शहर. }
ता. २८-१२-२७ }

रामचन्द्र कृष्ण लागू. एम्. ए.
प्रोफेसर, न्यू पूना कॉलेज.

होईल." ब्राह्मणांनीं, ब्राह्मणेतरांनीं, पंढरीच्या वारकऱ्यांनीं, मास्तरांनीं व विद्यार्थ्यांनीं तर अवश्य वाचावी.

केसरी, ज्ञानप्रकाश, नवाकाळ वगैरे उत्तम अभिप्राय. बृहन्महाराष्ट्रास ही कादंबरी चटका लावून सोडील.

---